


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १५ वें ] ऑक्टोबर १९६१ [ अंक १



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.







अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

# नवभारत

वर्ष पंधरावें
अंक पहिला

ऑक्टोबर
१९६१

संपादक-मंडळ

आचार्य **स. ज. भागवत**–श्री. **हरि कृष्ण मोहनी**–प्रा. **वि. म. बेडेकर**

प्रा. **गोवर्धन पारीख** का. संपादक



**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

हें मासिक श्री. **म. शं. साठे** यांनीं **दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई** येथें छापून **प्रा. वि. म. बेडेकर** यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

**पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,**
**'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९**

**२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,**
**C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )**

# बौद्धागमार्थसंग्रहः

पाली व संस्कृत ] [ मूल्य रु. २०

संपादक : डॉ. पी. एल्. वैद्य एम्. ए., डी. लिट्. ( पॅरिस )

अखिल भारतीय कीर्तीचे पंडित श्री. वैद्य यांनीं पाली व संस्कृत अशा समग्र बौद्ध साहित्याचें मंथन करून बुद्धचरित्रासंबंधीं व बुद्धाचे उपदेशपर संदर्भ यांत ग्रथित केले आहेत. या ग्रंथाच्या परिशीलनानें बौद्ध धर्माचें वा हीनयान व महायान या दोन्ही बौद्ध संप्रदायांचें सर्वांगीण दर्शन होईल. विद्वान व विद्यार्थी या दोघांना संग्राह्य असा हा संदर्भ ग्रंथ आहे. मूळ पाली व मूळ संस्कृत अशा बुद्धोक्तींचा हा संग्रह आहे.

याचा मराठी अनुवाद महाराष्ट्र राज्य, साहित्य व संस्कृति मंडळ लवकरच प्रसिद्ध करणार आहे.

बुद्धवंस, चरियापिटक, निदानकथा, ललितविस्तर, सुत्तनिपात, महावग्ग, चुल्लवग्ग, सुमंगलविलासिनी, महापरिनिब्बाण, समन्तपासादिका, दीघनिकाय, संयुत्तनिकाय, अंगुत्तरनिकाय, मज्झिमनिकाय, विसुद्धिमग्ग, बोधिचर्यावतार, मिलिन्दपञ्ह, थेरगाथा, थेरीगाथा, मध्यमकशास्त्र, शालिस्तंबसूत्र, समाधिराजसूत्र, लङ्कावतारसूत्र, सद्धर्मपुण्डरीक या ग्रंथांतील बुद्धचरित्र, भिक्षुभिक्षुणीशिक्षण, धर्म, प्रकीर्णक व संगीति अशा पांच विषयावरील संदर्भ यांत घेतले आहेत.

मिळण्याचें ठिकाण —

**प्राज्ञ पाठशाळा मंडळ, वाई** ( सातारा )

# सार-संकलन

## बर्लीनच्या प्रश्नाची उकल

The New Leader साप्ताहिकांतून श्री. विली ब्रँड्ट यांच्या बर्लीनच्या प्रश्नावरील विवेचनाचा सारांश असा —

" पश्चिम बर्लीनमध्यें विरोध ही एक मौजेची बाब म्हणून कधींच समजली जात नाहीं. त्याचप्रमाणें संकल्पित कार्यांतील जबाबदाऱ्या व धोके यांचा काळजीपूर्वक हिशेब मांडल्यावांचून ह्या शहराचे रहिवासी आपल्या देशबांधवांना प्रत्यक्ष कृतीचें आवाहनहि कधीं देत नाहींत. कारण त्यांना माहित आहे कीं युरोपवरील विपत्तीचा पहिला तडाखा प्रथमतः निश्चितपणें आपल्यालाच बसणार. यामुळेंच असें कांहीं घडलें कीं एक धोक्याची सूचना ताबडतोब दिली जाते—ती धमकी नसते—आणि सर्वांनीं तिचा विचार करावा हें बरें.

' बर्लीनच्या प्रश्नाचा आतां वीट आला ' असें वाटणारीं माणसें पौर्वात्य व पाश्चिमात्य दोन्ही गोलार्धांत आहेत, असें कधीं कधीं वाटतें. बर्लीनच्या प्रश्नांतून सुटका करून घेण्याची किंवा किमान त्यांतील जांच कमी करण्याची उत्कंठा कांहींना आहे, असाहि भास कधीं-कधीं होतो. परंतु पृथक् अशा कोणत्याहि ' उत्तरा'नें बर्लीनचा प्रश्न सुटण्याजोगा नाहीं. सबंध बर्लीन जरी एक झालें, तरी तें सबंध नगरच चहूंबाजूंनीं जोंपर्यंत कम्युनिस्ट प्रदेशानें वेढलेलें राहील, तोंपर्यंत हा जांच कायमच राहणार. आंतरराष्ट्रीय करारांनीं दिलेलीं आश्वासनें जरी हवीशीं असलीं तरी त्यामुळें रशियामुळें बर्लीनला होणारा जांच कांहीं टळत नाहीं; जर्मनी जोपर्यंत खंडित आहे, तोपर्यंत इतर कशाचाच कांहीं उपयोग नाहीं.

" ह्या परिस्थितींत महत्त्वाचा प्रश्न फक्त एकच उरतो. हा जांच किती मर्यादेपर्यंत वाढविण्यास रशिया धजेल ? ह्या प्रश्नाला समाधानकारक उत्तर देण्याचा दोस्तराष्ट्रांचा निर्धार असेपर्यंत पश्चिम बर्लीनच्या भौगोलिक स्थितीमुळें रशियाला मिळणारा फायदा मर्यादितच राहणार, आणि त्यांतहि अपायाचें पारडें शेवटीं रशियाकडेच झुकणार. थंड्या युद्धाला सुरुवात झाल्यापासून वारंवार ही गोष्ट सिद्ध झाली आहे, कीं एका बर्लीनमुळें रशियाला बऱ्याच अडचणींना तोंड द्यावें लागतें. बर्लीनमुळें पूर्व जर्मनीचें रक्तपिती झालेलें बाहुलें डळमळूं लागतें, एवढेंच कांहीं त्याचें कारण नव्हे; तर लोकशाहीवादी पाश्चिमात्य देशांना एकत्र येण्याची एक भूमि- कीं जेथें हीं राष्ट्रें आपली नैतिक वा भौतिक शक्ति एकवटतील व आपले मतभेद बाजूला सारून ऐक्यानें वागतील–मिळते, म्हणून बर्लीन रशियाच्या डोळ्यांत एवढें सलत आहे. आतांपर्यंत नेहमींच बर्लीनच्या संकटकाळांत नाटोच्या सभासद-राष्ट्रांना आपल्या ऐक्याचें सूत्र सांपडलें आहे, आणि आपली मदार त्यांच्यांतील मतभेदांवर असतांनाच नेमकीं हीं राष्ट्रें सलगपणें एकत्र येतात, हीच गोष्ट रशियाला खुपते. परंतु तरीसुद्धां संकटाचा गंभीरपणा जितका वाढेल, तितकें हें ऐक्य अधिकच दृढ होण्याची शक्यता दिसून येते.

"म्हणून क्रुश्चेव्हनें पूर्व जर्मनीशीं शांतता-करार केला तर बर्लीनमध्यें व जर्मनींत कांहींच होणार नाहीं, यावर लोकांनीं विश्वास ठेवावा असें कम्युनिस्टांना वाटतें. परंतु जर्मनींतील जैसे-थे परिस्थिति स्वीकारण्याच्या मिषाखालीं, ह्या शांतता-करारामुळें वस्तुतः जर्मनीच्या एकीकरणाची समस्या अधिकच चिघळणार आहे. ही समस्या सोडविण्याची जबाबदारी आपल्या शिरावर आहे, अशी कबुली आतांपर्यंत चारी दोस्त-राष्ट्रें देत आलीं आहेत, ही स्थिति एकदां बदलली कीं ही समस्या हाताळणें भयंकर बिकट होऊन बसेल. आणि आपल्या मातृभूमीविषयींचें प्रेम व राष्ट्रीय ऐक्याची आकांक्षा आपण जर्मन जनतेच्या अंतःकरणांतून उपटून काढूं शकूं असें समजणें हा एक भयावह भ्रम आहे.

" अर्थात् क्रुश्चेव्ह जर आपल्या जर्मन ' वसाहती '– शांततेचा करार करणार असेल, तर आपण कांहीं त्याला थोपवूं शकणार नाहीं, त्याचे परिणाम काय होतील याची गंभीर सूचना मात्र त्याला देणें, आपल्याला भागच आहे. जर्मन राष्ट्राला खंडित करणारी सीमारेषा ही स्थायी आहे, असा दावा मग करण्यांत

येईल, व ही सोयीची सीमारेषा म्हणजे आतां दोन सार्वभौम राष्ट्रांतील हद्द झाली आहे, असा दावा मांडण्यांत येईल. आणि मग मातृभूमि अखंड करण्याची मागणी कोणी केली, तर कम्युनिस्टांच्या परिभाषेंत त्या माणसाला एक 'dangerous revisionist and chanvist अशीं खास कम्युनिस्ट विशेषणें लावण्यांत येतील.

"द्विखंड मातृभूमीचा प्रश्न कोणींहि काढला कीं आम्ही जर्मन लोक खरोखरच revisionist होऊं. आमच्याच लोकांना आमच्यापासून विभागणारी रेषा ही एका परक्या राष्ट्राची सीमारेषा आहे, असें आम्ही मानूंच शकत नाहीं, आणि मानूं नयेहि.

"मध्ययुरोपांत काय परिस्थिति असावी हें रशियानें ठरवावयाचें आहे : आपल्या शेजाऱ्यांशीं शांततेनें व सलोख्यानें वागणारी व तडजोडीकरितां झटणारी जनता कीं revision ची मागणी करण्यावांचून गत्यंतरच न उरलेली जनता ? वेगळा शांतता-करार करून क्रुश्चेव्ह शांततेस हातभार लावणार नाहीं आहे; आपला देश अखंड केल्यावांचून जनतेला स्वस्थता लाभणार नाहीं आहे. म्हणून सबंध जर्मनीबाबतच्या चार राष्ट्रांच्या जबाबदारीस रशियाच्या कोणत्याहि प्रकारच्या एकतर्फी कृत्यामुळें बाध येणार नाहीं, याबाबत पाश्चिमात्य दोस्तराष्ट्रांनीं दृढ धोरण स्वीकारणें या क्षणीं विलक्षण महत्त्वाचें आहेसें मला वाटतें. जर्मनी अखंड करण्याबाबतचे दोस्तराष्ट्रांचे हक्क व त्याबाबतचीं त्यांचीं कर्तव्यें आणि देश अखंड करण्यासाठीं जर्मन लोकांनीं चालवलेलें राष्ट्रीय आंदोलन परस्परांशीं संलग्नच राहिलीं पाहिजेत. कारण सध्यांची चिघळलेली परिस्थिति सुधारण्याचें ढोंग करून रशियानें मांडलेले नवे प्रस्ताव पश्चिम बर्लीनच्या नागरिकांत त्यांच्या रक्षणकर्त्यांत फाटाफूट पाडण्याच्या आशेनें जन्मास आले आहेत. वेगळ्या शब्दांत सांगावयाचें झाल्यास ही भक्कम फळी एकदांची मोडून टाकण्याचा त्यांचा हेतु आहे. आणि ज्याप्रमाणें बर्लीन व पाश्चिमात्य राष्ट्रें यांच्या दरम्यान प्रवास करण्याच्या आपल्या सैनिकांच्या हक्काचें रक्षण त्यांनीं केलें असतें, त्याच स्वरूपाची हालचाल त्यांनीं जर्मनींतील रहदारींत कम्युनिस्टांनीं हात घातला व अडथळे आणले म्हणून केली नाहीं, तर कम्युनिस्टांचा हेतु सफळ होईल. बर्लीनबाबतचीं दोस्तराष्ट्रांचीं कर्तव्यें व त्यांचे हक्क यांनीं जर शहरांतील नागरी जनतेचें मनोगत आपल्या व्याप्तींत सामावून घेतलें नाहीं, तर रक्षणकर्त्यांची भूमिकाच त्यांना पार पाडतां येणार नाहीं आणि जर्मन जनतेचा त्यांच्यावरील विश्वास उडेल.

"हा मुद्दाहि कदाचित् जमेस धरला जात असेल, परंतु आणखी एक मुद्दा आहे कीं जो अद्यापि बऱ्याच पाश्चिमात्य पुढाऱ्यांना तितकासा जाणवला नसल्याची शक्यता आहे. हा मुद्दा असा कीं, पश्चिम जर्मनींतील ज्या भागांत रहदारी वा वाहतूक तितकीशी नाहीं, त्या भागांशीं असलेलें पश्चिम बर्लीनचें नातें संपूर्णपणें तुटण्याचा वा तें कमकुवत होण्याचा धोका आहे. बर्लीन हें स्वतंत्र शहर बनवण्याच्या व इतर तात्पुरत्या करार-प्रस्तावांना बर्लीनवासीयांचा विरोध असण्याचें सर्वांत मुख्य कारण म्हणजे चलनपद्धति : आमची चलनपद्धति ठरविण्याचा हक्क आम्हांला आहे, ह्या भावनेचें जतन. १९४८ सालापासून झालेली सर्व प्रगति निव्वळ या एका आधारावर झाली : ह्याच मुद्यावरून वादंगास आरंभ झाला आणि पश्चिम जर्मनीची चलनपद्धति बर्लीनमध्यें स्वीकृत झाल्यावर त्याच पायावर लोकांच्या आशेनें जोम धरला. आणि केवळ बर्लीनवासीयांनाच नव्हे तर पश्चिम जर्मनींतील व परदेशांतीलहि भांडवल गुंतवूं पाहणाऱ्यांना विश्वास वाटला तो एकाच वस्तुस्थितीमुळें : पश्चिम बर्लीन हा पश्चिम जर्मनीच्या आर्थिक व्यवस्थेचा अविभाज्य घटक आहे. पश्चिम जर्मनीची चलनपद्धति हा पश्चिम बर्लीनच्या जीवनाचा मेरुदंड आहे. पश्चिम बर्लीनच्या दर्जांत कांहींएक फरक न करतां फक्त तेथील चलनपद्धति बदलली, पश्चिम जर्मनीची चलनपद्धति बेकायदेशीर ठरवून पश्चिम बर्लीनपुरती एक स्वतंत्र चलनपद्धति अंमलांत आणली, तर केवळ एका वर्षांतच आर्थिक व नैतिक दोन्ही दृष्टींनीं पश्चिम बर्लीन उध्वस्त होईल. तें एक मृत नगर बनेल. आणि मग दोस्तराष्ट्रांनीं बारा हजारांऐवजीं सैनिकांच्या तीन डिव्हिजन्स जरी आणून उभ्या केल्या, तरी ते बर्लीनचें रक्षण करूं शकणार नाहींत; कारण रक्षण करण्याजोगें कांहींच तेथें राहिलेलें नसेल.



अनुक्रमणिका






" हें रशियास पक्कें ठाऊक आहे. स्वतंत्र शहर बनविण्याच्या रशियाच्या प्रस्तावामागें हें सर्व आकर्षण आहे. "

## बिकट कामगिरी

श्री. केनेडी अमेरिकेचे राष्ट्राध्यक्ष झाल्यापासून वा त्या आधींपासूनहि श्री. डलेस यांचें परराष्ट्रीय धोरण मागें पडूं लागलें होतें व एक नवें धोरण योजिलें जात होतें. या संक्रमणामुळें लष्करी करार करून अमेरिकेनें आपल्या गटांत ओढून घेतलेलीं राष्ट्रें अमेरिकेला दुरावूं लागलीं आहेत. या संक्रमणाचा पाकिस्तानच्या संदर्भांतील विचार Manchester Guardian साप्ताहिकाच्या १३ जुलैच्या अंकांतील एका संपादकीय टिपणांतून घेण्यांत आला आहे.

" पाकिस्तानचे राष्ट्राध्यक्ष श्री. अयूबखान वाशिंग्टनला गेले आहेत. वास्तविक त्यांचें प्रयाण नोव्हेंबर महिन्यांत होण्याचें ठरलें होतें, आतां तें चार महिने अलीकडे घेण्यांत आलें; यामुळें कित्येकांना असें वाटत आहे, कीं पाकिस्तान व अमेरिका यांच्यांतील संबंध जितक्या लौकर सुधारतील तेवढें बरें. कारण अयूबखान व त्यांचे सहकारी यांनीं अनेक मुद्दे उकरून काढले आहेत; त्यांचा निकाल प्रे. केनेडींनीं लावावा, अशी त्याची इच्छा आहे.

" जनरल चँग-कै-शेक, जनरल फूमी नोसावन व अमेरिकेचे आशियांतील कित्येक सहकारी व कुळें यांच्याप्रमाणेंच पाकिस्तानला असें वाटत आहे, कीं वॉशिंग्टनमध्यें आंखल्या गेलेल्या नव्या धोरणामुळें आपल्याला बाजूला टाकलें जात आहे. श्री. डलेस यांच्या कारकिर्दींत या सर्वांना जवळ करण्यांत आलें. श्री. डलेस यांना रशियाच्या विरुद्ध असणाऱ्या लष्करी मित्रांची आवश्यकता होती, आणि या मित्रांना शस्त्रास्त्रांची आवश्यकता होती– मुख्यत्वेंकरून आपापल्या सीमांचें रक्षण करण्याकरितां. तटस्थता त्याकाळीं ' अनैतिक ' समजली जात होती.

" परंतु श्री. डलेस यांच्या काळांतहि शेवटीं-शेवटीं भ्रमनिरास होण्यास आरंभ झाला. बगदादकरारामुळें इस्राएलविरुद्ध जी मदत जनरल नुरी-ए-सैद यांना मिळायला हवी होती, ती त्यांना मिळाली नाहीं-अशा परिस्थितींत त्यांच्या देशाला बगदाद-करार मान्य होणें शक्यच नव्हतें; आणि अयूबखान येण्यापूर्वीपासूनच पाकिस्तानचे पंतप्रधान श्री. फिरोजखान नून अमेरिकेस अशा धमक्या देत होते, कीं काश्मीरच्या तंट्याबाबत याहून अधिक मदत अमेरिकेकडून न मिळाल्यास आपल्याला दुसरे मित्र शोधण्याबाबत पहावें लागेल. नंतर पाकिस्ताननें अशीहि तक्रार केली, कीं यू–२ प्रकरणाबाबत आम्हांला उगाच ठपका बसला ( कारण तें विमान पेशावराहून गेलें होतें ), परंतु काश्मीरचा प्रश्न मात्र तसाच लोंबकळत आहे.

" आणि जसजशीं नवीं आणि अधिक पल्ल्याचीं अस्त्रें जन्म पावलीं, तसतशी तटस्थता ही कमी–कमी ' अनैतिक ' बनत गेली. किंबहुना तटस्थ राष्ट्रांशीं चांगले संबंध असणें ही गोष्ट जुन्या मित्रांच्या निष्ठेइतकीच अमेरिकेला महत्त्वाची वाटूं लागली. प्रे. आयसेनहॉवर यांचा आशिया खंडाचा दौरा व तटस्थांच्या मुकुटमण्यास उद्देशून त्यांनीं उच्चारलेले आत्मीयतेचे शब्द, यांवरून हें उघड झालें कीं डलेस यांचें धोरण १९५९ सालींसुद्धां निष्प्रभ होत चाललें होतें; आणि ह्यावर्षी प्रे. केनेडींनीं सत्तासूत्रें हातीं घेतल्यावर त्याचा वधच करून टाकला.

" म्हणून या सत्ताग्रहणाच्या सुमारास कराचीचें Dawn हें दैनिक असें सुचवीत होतें, कीं पाश्चिमात्यांच्या नजरेंत तटस्थता हा एक विशेष गुण झाला आहे. व अ-तटस्थता हा एक मूर्खपणा ठरला आहे. " उप–राष्ट्राध्यक्ष श्री. जॉन्सन यांनीं टेक्ससमध्यें विपुल मतांना पदरांत पाडणारें तंत्र अवलंबून पाहिलें व त्यामुळें उलट परिस्थिति अधिकच चिघळली. काश्मीरच्या समस्येबाबत त्यांनीं उडवाउडवीचीं उत्तरें दिलीं, आणि जेव्हां ते वॉशिंग्टनला परतले तेव्हां त्यांनीं असें सांगितलें कीं, प्रे. केनेडींच्या विनंतीनुसार पं. नेहरूंना ' त्यांनीं आपल्या नेतृत्वाचा विस्तार आग्नेय आशियांतहि करावा ' असा आग्रह आपण केला आहे. याच सुमारास अफगाण सीमेवर बंडखोरांविरुद्ध अमेरिकन शस्त्रास्त्रें वापरलीं किंवा काय, अशा अमेरिकेकडून करण्यांत आलेल्या विचारणेबद्दल पाकिस्ताननें बरीच नापसंती दाखविली; अशा परिस्थितीस तोंड देण्याकरितांच पाकिस्तानला शस्त्रास्त्रांची गरज आहे, परंतु









अनुक्रमणिका

अफगाणीस्तानशीं संबंध चांगले रहावेत अशी अमेरिकेची इच्छा– कारण त्या प्रदेशांत रशियाशीं मुकाबला आहे. शिवाय अलीकडेच वॉशिंग्टन येथें भरलेल्या आंतरराष्ट्रीय बैठकींत भारत व पाकिस्तान यांना देण्यांत येणाऱ्या कर्जांतील फरक पाहून पाकिस्तान हताश झालें आहे— जरी लोकसंख्येच्या तुलनेंत पाकिस्तानला वाजवीपेक्षां जास्तच वांटा मिळाला आहे.

" या कर्जांची घोषणा होण्यापूर्वीच श्री. अयूबखान यांनीं New York Times च्या प्रतिनिधीस दिलेल्या मुलाखतींत असें म्हटलें, कीं अमेरिकेचें सध्यांचें धोरण ' खंबीर व दृढ नाहीं; ... या धोरणांत मित्र असलेले व मित्र नसलेले दोघांनाहि सारखेंच मानाचें आसन दिलें जातें ' असें दिसतें.

" श्री. डलेस यांचें धोरण अदूरदर्शी होतें व सध्यांचें अमेरिकेचें धोरण ' स्वतंत्र जगा'ला अधिक स्वातंत्र्य देऊं करणारें आहे, असें सांगण्याचा पाकिस्तानला ( किंवा फोर्मोसाला वा सयामला ) कांहींच उपयोग नाहीं. पूर्वींच्या धोरणांतून नव्या धोरणांत संक्रमण करणें दुष्कर आहे व आपल्या मित्रांनींहि हें संक्रमण करावें म्हणून त्यांना मदत करणें, ही बिकट कामगिरी वारश्यानें प्रे. केनेडींनीं संपादन केली आहे. परंतु हें कांहीं फक्त एकट्या केनेडींचेंच काम नाहीं, कारण इंग्लंडसुद्धां SEATO व Cento चें सभासद आहे."

## जगभरचीं टेडी पोरें

समाजाचे कोणतेच निर्बंध न मानणारी युवकमंडळी आतां जगांत सर्वत्रच दिसून येत आहेत. या युवकांच्या बेशिस्त वर्तनाचा व ते जाणूनबुजून करीत असलेल्या गुन्ह्यांचा एक समाजशास्त्रीय घटना म्हणून अभ्यास व्हावयास हवा—एवढ्या मोठ्या प्रमाणावर हे गुन्हे घडत आहेत. असा अभ्यास करण्याचा एक प्रयत्न —विशेषतः इंग्लंडच्या संदर्भांत श्री. टी. आर. फिव्हल यांनीं Encounter मासिकाच्या ऑगस्टच्या अंकांत केला आहे. आपल्याकडेहि विद्यार्थ्यांच्या बेशिस्त व समाजबाह्य वर्तनाबद्दल बरीच उलटसुलट चर्चा होत असल्यानें हा लेख उद्बोधक ठरेल.

" टेडी पोरांचीं टोळकीं आणि इंग्लंडमधील युवकांची वाढती बेकायदा वागणूक– हीं नव्या कशाचें तरी, एका नव्या लाटेचें, प्रतिनिधित्व करतात, व तीं विशिष्ट सामाजिक परिस्थितींतून निर्माण झालीं आहेत, या दृष्टिकोनास जगभरच्या तरुणांच्या हालचाली पाहिल्या तर पाठिंबा मिळतो. इंग्लंडमध्यें झाले त्याप्रकारचे दंगेधोपे इतरत्रहि झाल्याच्या बातम्या देशोदेशींहून आल्या आहेत, व हे देश प्रामुख्यानें तांत्रिक व औद्योगिक दृष्ट्या पुढारलेले देश आहेत. इंग्लंडमधील दंग्याधोप्यांशीं मिळत्याजुळत्या युवकांच्या कृत्यांच्या बातम्या गेल्या कांहीं वर्षांचीं देशोदेशींचीं वर्तमानपत्रें पाहिलीं तर ठळकपणें आढळून येतील. विशेषतः अमेरिकेंत तर एकाच वर्षांत पांच टक्के मुलें पोलिसांच्या तावडींत सांपडलीं, आणि मोटारचोरी व दरोड्याकरितां पकडण्यांत आलेल्या गुन्हेगारांपैकीं पन्नास टक्के एकवीस वयाखालील होते. जर्मनी, ऑस्ट्रिया, फ्रान्स, स्वीडन, आणि एवढेंच काय पण रशियांतूनसुद्धां अशाच तऱ्हेच्या बातम्या आल्या आहेत. त्यांचें परिमाण ठरविणें जरी कठीण असलें तरी कोणत्याहि समस्येनें अतिशय विराट स्वरूप धारण केल्याशिवाय सोव्हिएट वृत्तपत्रें त्या समस्येचें अस्तित्वच कबूल करीत नाहींत, अशी स्थिति असल्यानें रशियांतहि ही समस्या तेवढीच विक्राळ आहे, असें म्हणणें अनुचित ठरणार नाहीं. आशिया खंडांत जपानहून अशींच वृत्तें हातीं लागतात. १९३८ सालच्या आंकड्यांशीं तुलना करतां तेथील आतांचा आंकडा दसपटीनें मोठा आहे. या सर्व प्रकारावरून असा निष्कर्ष निश्चितच निघतो, कीं आजच्या युवकांत बेकायदेशीर वर्तनाची एक नवीच वृत्ति आहे व ही वृत्ति संघटित व विध्वंसक रूपानें व्यक्त झाली आहे.

" एक नवी सामाजिक घटना म्हणून अभ्यास करण्याइतकें महत्त्व या प्रकाराला आहे काय? या क्षेत्रांत प्रत्यक्ष कार्य करणाऱ्यांचें म्हणणें असें, कीं पोरांच्या ह्या बेकायदेशीर वर्तनांत नवें असें कांहींच नाहीं, फक्त त्यांच्या वर्तनाची नोंद आतां योग्यप्रकारें ठेवण्यांत आली आहे इतकेंच. बालपणांतील अस्थिर जीवनामुळें सामान्यतः ह्या वृत्तींचें बीज पेरलें जातें, घराण्याचा संबंध इतिहासच वाईट असतो वा घटस्फोटादि प्रकारामुळें घरास घरपणा राहिलेला नसतो. अशा घरांतील मुलगा ( वा










अनुक्रमणिका

मुलगी ) भावनिक अस्थिरतेमुळें घराची भावनाच नाकारतात. शाळा ही घराची एक सह-संस्था बनते. तितकीच निरथक. स्थिरता, मान व दर्जा मिळविण्याचा मग एकच उपाय उरतो; तो म्हणजे सडकेवरील टोळकीं व समाजास धुडकावून लावणें. मुलांच्या गुन्हेगारीचा हा सांचा अद्याप बदललेला नाहीं, असें या कार्यकर्त्यांचें म्हणणें. भडक कपडे घालणें ही एकच काय ती भर त्यांत पडली आहे. दुसरें असें, कीं बालगुन्हेगारीची समस्या भासते तेवढी प्रचंड नाहीं. उदाहरणार्थ, अमेरिकेंत बालगुन्हेगारांचें वर्गीकरण मुद्दामच टाळण्यांत येतें, कारण नाहींतर वर्ण-भेद केल्यासारखें होण्यांचा संभव आहे. गुन्हेगारीस उत्तेजन देणाऱ्या अशा अत्यंत दरिद्री परिस्थितींत राहणाऱ्या प्युर्टोरिकनांचें व निग्रोंचें प्रमाण अमेरिकेंतील बालगुन्हेगारांत अधिक आहे.

"महायुद्ध हें तिसरें कारण. युरोपमध्यें १९३९–४५ च्या दरम्यान जन्मास आलेलीं मुलें आतां पौगंडावस्थेंत आहेत. इंग्लंडमध्यें हातीं घेतलेल्या निरीक्षणाच्या कामांतून आजचे कांहीं युवक हे युद्धकाळांत अत्यंत हालअपेष्टा सोसाव्या लागलेले असल्याचें आढळून आलें आहे. जर्मनींत तर हे प्रकार सर्रास आढळून येतात. आश्चर्याची गोष्ट अशी, अधिक हाल काढावे लागूनहि जर्मन युवकांचें वर्तन इंग्लंडमधील युवकांच्या तुलनेंत प्रचंड प्रमाणावरील नाहीं. जपानबाबतहि असेंच म्हणतां येऊं शकेल. जपानी विद्यार्थ्यांच्या बेशिस्त वर्तनाच्या मुळाशीं, कांहीं अंशानें का होईना, युद्धकालीन अंदाधुंदी, पराजयाचा धक्का, ॲटम बॉंब व शरणागति या गोष्टी असल्या पाहिजेत. रशिया व पोलंड या देशांत तर लष्करी व नागरी जीवनाचा नाश सर्वांत अधिक झाला होता, तेव्हां कम्युनिस्ट दडपशाहीला न जुमानतां तेथेंहि ही वृत्ति पसरावी, यांत नवल तें काय !

" वरील सर्व विधानांत कांहीं थोडें तथ्य असेल, परंतु त्यामुळें युवकांच्या दंग्याधोप्यांच्या आंतरराष्ट्रीय लाटेबाबत खरा खुलासा कांहीं होत नाहीं. आणि ही घटना असले खुलासे देऊन उडवून लावतां येणारच नाहीं. कारण, एकतर, बऱ्याच देशांतील बालगुन्हेगारीच्या प्रमाणाचे आंकडे निव्वळ प्रचंड आहेत. उदाहरणार्थ, इंग्लंडनें सामाजिक कल्याणाच्या क्षेत्रांत केलेली प्रगति जमेस धरतां, तेथील बालगुन्हेगारीचें प्रमाण अवास्तव आहे. म्हणून हा युद्धाचा परिणाम आहे असें म्हणणें हें फारतर आंशिक सत्य होईल. दुसऱ्या बाजूनें फक्त एकच उदाहरण सांगावयाचें झाल्यास, युद्धांत तटस्थ असलेल्या स्वीडनमध्येंसुद्धां या समस्येनें चांगलेंच भंडावलें आहे. हें कसें काय ? अमेरिकेंत गेलीं नऊ वर्षें नियमितपणें बालगुन्हेगारीचें प्रमाण वाढतेंच आहे. तेव्हां हा अमेरिकन समाजाच्या सद्यःकालीन स्थितीचाच एक परिणाम आहे, हें उघड आहे. शिवाय बालगुन्हेगारींत अलीकडे झालेली वाढ वैशिष्ट्यपूर्ण आहे. आर्थिक सुबत्ता वाढत असतांच हें गुन्हेगारीचें प्रमाणहि वाढत आहे; त्यामुळें कांहीं जर्मन पंडितांनीं तर ह्याला welfare criminality असें नांव दिलं आहे. अर्थात् हें प्रमाण सर्वत्र सारखें नाहीं व देशागणिक त्यांत कांहीं फेरफारहि आढळतात. परंतु तरी या सर्व प्रकाराचा अर्थ काय ?

" फ्रान्स, इटली, जर्मनी यांसारख्या देशांत ज्या चिवटपणें बूर्झ्वा संस्कृतीच्या ऐतिहासिक मल्यांचें जतन वा पुनःस्थापना झाली, तें खरोखर आश्चर्यकारक आहे. परंतु आपल्या समोरील चित्राची ही फक्त एक बाजू झाली. आणखीहि एक बदल हवेंत होता. हा बदल अतिशय शांतपणें घडून आला. वाढती भरभराट व उत्पादन-पद्धतीचीं नवीं तंत्रें यांनीं एक सामाजिक क्रांति घडवून आणली. पूर्वीच्या बूर्झ्वा वर्गपद्धतीवर नव्या वर्गवारीचा कमी जांच असलेल्या व अधिक लवचिक समाजाची रचना लादण्यांत येऊं लागली. त्यांतूनच मग इंग्लंड-अमेरिकेप्रमाणें इतरत्रहि मोठ्या प्रमाणावर युवक स्व-तंत्र झाले, आणि त्यामुळें व्यापारी स्वरूपाची युवक-संस्कृति जन्मास आली–आणि गुन्हेगारीचें प्रमाण वाढलें. गेल्या दशकाच्या शेवटीं–शेवटीं सर्वच देशांना हा शोध लागत गेला. देशांतील युवकांचा एक गट असंतुष्ट व अस्थिर आहे, खूपच युवक व युवती आपला फुरसतीचा वेळ विध्वंसक कृत्यांत घालवतात, कुठें जाण्याजोगें असें एखादें ठिकाण त्यांना नसतें, व याबाबत कांहींतरी उपाययोजना झाली पाहिजे, याची वाढती जाणीव सर्वांना होऊं लागली. विसाव्या शतकाच्या चौथ्या दशकांत बूर्झ्वा संस्कृतीनें युद्धोत्तर










बिकट परिस्थितींतून युवकांना मार्गदर्शन केलें होतें, परंतु ती संस्कृति आतां भरभराटीच्या पांचव्या दशकांत मार्गदर्शन करण्यास असमर्थ वाटूं लागली.

" इंग्लंड, पश्चिम जर्मनी, ऑस्ट्रिया, नॉर्वे, फ्रान्स आणि इटली या सहाहि देशांत १९५० ते ६० या दशकाचा मध्यकाल हा पौंगडावस्थेंतील लोकांकरितां संक्रमणकाळ ठरला. युवकांची वृत्तीच एकदम बदलली. असंतोषाचे नवे प्रवाह वाहूं लागले. कालक्रमानें ह्या असंतोषानें निश्चित रूप घेतलें. देशभेद न मानणारें हें सार्वत्रिक रूप पाहून काउन्सिल ऑफ युरोपनें सभासद-राष्ट्रांतील बालगुन्हेगार-तज्ज्ञांकडून अहवाल मागविले. ह्या अहवालांतून ( Juvenile Delinquency in Post-War Europe ) कांहीं महत्त्वपूर्ण निष्कर्ष निघाले. युद्धोत्तर काळांतील १९५४ ते ५७ ह्या वर्षांत पश्चिम जर्मनीच्या औद्योगिक उत्पादनांत तीस टक्के वाढ झाली, बेकारी चाळीस टक्यांनीं घटली,- परंतु बालगुन्हेगारी मात्र पन्नास टक्यांनीं वाढली. त्याच काळांत ऑस्ट्रियांत औद्योगिक उत्पादन चाळीस टक्यांनीं वाढलें, बेकारींत तीस टक्यांनीं घट झाली,- तर बालगुन्हेगारांचें प्रमाण साठ टक्क्यांनीं वर गेलें. इतर देशांतहि थोड्याफार फरकानें हेंच घडून आलें. यांतील बरेचसे गुन्हे तर चांगल्या सुखवस्तु घरांतील मुलांनीं केले होते. फ्रान्समधील अहवालांत तर ' सामाजिक नियम धुडकावून लावणें, हा ह्या कृत्यांतील महत्त्वाचा भाग होय ' असें म्हटलें आहे.

" या प्रकारांना आळा घालण्यासाठीं उपाययोजनाहि सुचविल्या जात आहेत, त्यांवर विपुल चर्चा होत आहे. परिवर्तनशील समाजाच्या अचानक जन्मामुळें बूर्झ्वा संस्कृतीच्या रूढी कोंसळत आहेत. अतिशय लहान वयांत स्व-तंत्रता मिळाल्यामुळें ( वा लादल्यामुळें ) आजचे युवक व्यापारी स्वरूपाच्या संस्कृतीच्या प्रभावास बळी पडतात. म्हणून युद्धोत्तर बालगुन्हेगारी हें युवकांच्या जीवनांत घडून येत असलेल्या क्रांतीचें एक लक्षण मानलें पाहिजे. "

## सूर्यकिरणांना लगाम

निसर्गशक्तीला कामीं लाविण्याचे प्रयत्न इतर देशांतून हरतऱ्हेनें करण्यांत येत आहेत. निसर्गशक्तींत सर्वांत मुबलक प्रमाणांत उपलब्ध असणारी शक्ति म्हणजे सौर शक्ति. तिचा वापर करण्याबाबत इस्त्राएलनें बरीच आघाडी मारली आहे व हीं यंत्रें बनवून तीं भारतादि देशांत विकावींत असाहि त्या देशाचा मानस दिसतो. पुढील सारांश News from Israel या पाक्षिकाच्या १ सप्टेंबरच्या अंकांतील एका लेखाचा आहे.

" सबंध इस्त्राएलवर एवढ्या मोठ्या प्रमाणांत सूर्यप्रकाशाचा वर्षाव होत असतो, कीं ह्या सूर्यप्रकाशांतील प्रचंड शक्तीला लगाम कसा घालावा यावर डॉ. टॅबोर यांनीं आपलें सर्व लक्ष केंद्रित केलें आहे. उन्हांतील शक्तीचा उपयोग करून घेणें ही कल्पना कांहीं नवीन नव्हे व असे प्रयत्न अनेक खंडांतून चाललेले आहेतच. परंतु व्यापारी प्रमाणावर पाणी तापविण्यासाठीं सार उपकरणें योजिणारा इस्त्राएल हा जगांतील पहिलाच देश होय. हीं उपकरणें आतां निर्यातहि होतात.

" बाष्पोत्पादक सौरयंत्रें व संग्राहक सौरयंत्रें यांवर डॉ. टॅबोर यांनीं विशेष संशोधन केलें आहे. परंतु त्यांच्या प्रयोगांपैकीं सर्वांत उद्बोधक प्रयोग म्हणजे सौर तळ्यांचा. पाण्यांत कांहीं रासायनिक द्रव्यें टाकून खोल खालीं सूर्याची उष्णता केंद्रित करतां येते व त्यामुळें प्रचंड शक्ति पैदा करतां येते. या प्रयोगांतील सर्वच अडचणींतून अद्याप मार्ग निघाला नसला, तरी सर्वच वाळवंटी प्रदेशांना लाभदायक ठरेल असा एखादा नवीन शोध लावण्याच्या मार्गावर ते आहेत, असें वाटतें. सर्वांत मोठी समस्या म्हणजे प्रयोगांत जेव्हां मोठ्या तळ्यांचा वापर करण्यांत येईल तेव्हां त्यांतील पाण्यावर वाऱ्याचा काय परिणाम होईल, ही आहे.

" जेरुसलेमच्या हिब्रू विद्यापीठांतील राष्ट्रीय विज्ञान प्रयोगशाळेंत सौरशक्तीच्या संग्राहक पेटिकेचें एक प्रात्यक्षिक करून दाखविण्यांत आलें. या प्रात्यक्षिकांत चाळीस मीटर लांबीचे प्लॅस्टिकचे बनविलेले उष्णता-संग्राहक वापरण्यांत आले. हीं सर्व उपकरणें प्रथमतः इस्त्राएलमध्येंच वापरण्यांत आलीं. संग्राहक पेटिकेंतील उपकरणांमुळें वीजहि निर्माण होईल व ह्या विजेचा दर एका किलोवॅट-तासास पांच सेंट्स असा पडेल. ज्या खेड्यांत जळण उपलब्ध नाहीं, त्यांना हा दर फारसा महाग वाटणार नाहीं.

" आतां, अशीं यंत्रें बनविण्याकरितां एक कारखाना उभारल्यास त्याकरितां जगांतील वेगवेगळ्या देशांकडून भांडवल मिळण्याची शक्यता आहे. आस्ट्रेलिया, आफ्रिका व भारत या देशांत या यंत्रांना चांगलीच मागणी मिळेल. एका यंत्राची किंमत अंदाजें चार हजार डॉलर्स असेल. "

## सामाईक बाजारपेठ : एक विवेचन

पश्चिम युरोपमध्यें कांहीं वर्षांपासून अस्तित्वांत असलेल्या सामाईक बाजारपेठेंत इंग्लंड सामील होण्याचा संभव आहे, हें कळल्यावर राष्ट्रकुलांतील कांहीं राष्ट्रांना आपल्या निर्यात-व्यापाराबद्दल काळजी वाटूं लागली. भारताला याबद्दल विशेष काळजी वाटते, हें उघडच आहे. म्हणून इंग्लंड जरी सामाईक बाजारपेठेंत सामील होणार असलें, तरी त्यामुळें राष्ट्रकुलांतील इतर राष्ट्रांवर वाईट परिणाम होणार नाहीं, याची काळजी इंग्लंडनें घेतली पाहिजे, असा राष्ट्रकुल-सभासद-राष्ट्रांचा आग्रह आहे. सामाईक बाजारपेठांचें महत्त्व व त्यांचें कार्य याविषयीं लंडनच्या Financial Times मध्यें श्री. मायकेल शँक्स यांनीं केलेल्या विवेचनाचा हा संक्षेप The Radical Humanist च्या ३ सप्टेंबरच्या अंकांतून घेतला आहे.

" पश्चिम युरोपांत दोन प्रमुख आर्थिक व्यवहाराचे गट आहेत : एक तर 'the six' ची सामाइक बाजारपेठ व दुसरा तर युरोपियन फ्री ट्रेड ॲसोसिएशन ( एफ्टा ). एफ्टाचें नांव जरी लोकांना तितकेसें माहित नसलें तरी तोहि एक तुल्य महत्त्वाचा गट आहे.

" एफ्टा किंवा the Seven ची प्रतिष्ठापना the Six व the Seven ह्या दोहोंचें व्यापारक्षेत्र सामावून घेणाऱ्या मोठ्या संस्थेविषयींचीं बोलणीं फिसकटल्यावर मग करण्यांत आली. यामागें दोन हेतू होते: फिसकटलेल्या बोलण्यांतील मुक्तव्यापारक्षेत्राविषयींच्या योजनेंतील कलमें कार्यकारी करण्याकरितां प्रयत्न करणें व एफ्टांत सामील झालेल्या सात राष्ट्रांतच परस्परांमध्यें व्यापार वाढविणें.

" इंग्लंड व डेन्मार्क या दोन देशांनीं एफ्टाच्या इतर सभासद-राष्ट्रांशीं मोकळी चर्चा करून सामाईक बाजारपेठेचें सभासदत्व घेण्याचें ठरविल्यामुळें पहिला हेतु बराचसा सिद्ध झाला आहे. पाश्चिम युरोपमधील आर्थिक फाटाफूट मिटविणें व एफ्टाच्या सातहि सभासदांना सामाईक बाजारपेठेचें संपूर्ण वा अर्ध-सभासदत्व देणें या घटना आतां यथावकाश घडून येतील, असें वाटतें. हें जर झालें व तें जेव्हां होईल, तेव्हां त्याचा अर्थ असा नाहीं, कीं एफ्टा अपयशी ठरली. उलट त्याचा अर्थ असा असेल, कीं एफ्टानें आपलें मुख्य उद्दिष्ट गांठलें.

" आंतर-एफ्टा व्यापारवृद्धीच्या दुसऱ्या उद्दिष्टाबाबत यश मिळाल्याचेंच वार्षिक अहवालांत सांगितलें आहे. सभासद-राष्ट्रांत परस्परांमध्यें होणाऱ्या व्यापारावरचा कर वीस टक्क्यांनीं कमी केल्याची घोषणा १ जुलै १९६० रोजीं करण्यांत आली व वर्षभरानें आणखी दहा टक्के कपात जाहीर केली. ही दुसरी कपात प्रथम योजिल्याप्रमाणें या वर्षअखेर करण्यांत येणार होती.

" आंतर-एफ्टा व्यापार ही संस्था सुरूं झाल्याच्या पहिल्या वर्षांतच पूर्वीपेक्षां दुपटीनें वाढला. इतर एफ्टा

बाजारपेठांत पोर्तुगालनें आपला व्यापार एकतीस टक्क्यांनीं वाढविला, ऑस्ट्रियांत ही वाढ पंचवीस टक्क्यांनीं झाली, नॉर्वेत बावीस टक्क्यांनीं. सर्वांत कमी वाढ इंग्लंड व डेन्मार्क या देशांच्या व्यापारांत झाली : अनुक्रमें दहा व बारा टक्के. निर्यातीत दहा टक्क्यांपेक्षां अधिक वाढ करण्याचें उद्दिष्ट फक्त इंग्लंडच तेवढें गांठूं शकलें नाहीं. ऑस्ट्रिया व स्वीडन यांनीं आपापली निर्यात वीस व सतरा टक्क्यांनीं वाढविली."

## अमेरिकन मदतीचा तपशील

अमेरिकन सरकारच्या माहितीखात्यातर्फे प्रसारित करण्यांत आलेल्या एका पत्रकावरुन खालील तपशील घेण्यांत आला आहे.

अमेरिकेकडून भारताला मिळणारी मदत अनुदान व कर्ज अशा दोन रूपांत मिळते. आतांपर्यंत झालेल्या करारांनुसार अमेरिकेकडून १८६२·३ कोटी रुपये भारताला मिळाले आहेत.

"अनुदान म्हणून मिळालेल्या रकमेची परतफेड करावी लागत नाहीं. उदाहरणार्थ पब्लिक लॉ, कलम पहिलें या खालीं भारताला पुरवठा केलेल्या अन्न-धान्याच्या किंमतीचा एक-तृतीयांश (म्हणजेच ७८८·२ दशलक्ष डॉलर्स) हिस्सा हें अनुदान आहे. ह्या अनुदानाचा उपयोग आर्थिक विकासाकरितां करावयाचा आहे. त्याचप्रमाणें इंडो-अमेरिकन तांत्रिक सहकार्य-योजनेनुसार ३४०·३ दशलक्ष डॉलर्सचें अनुदान भारताला मिळालें आहे. सर्व अनुदानांची मिळून एकूण रक्कम ११२८·५ दशलक्ष डॉलर्स होते.

"कर्जें परतफेडीच्या बोलीवर दिलेलीं असतात. १९५१ सालीं ठरलेलें गव्हाचें कर्ज व आयात-निर्यात बँकेनें दिलेलीं कर्जें (एकूण ४३६·६ दशलक्ष डॉलर्स) हीं डॉलर्समध्येंच परत करावयाचीं आहेत. विकास कर्ज-फंडानें दिलेलीं कर्जें (५१३·४ दशलक्ष डॉलर्स), तांत्रिक सहकार्य-योजनेखालीं दिलीं गेलेलीं कर्जें (१५६·१ दशलक्ष डॉलर्स) व पब्लिक लॉ ४८० खालीं पुरविलेल्या अन्नधान्याच्या विक्रीची रक्कम (१०८६ दशलक्ष डॉलर्स) — सर्व मिळून १७५५·५ दशलक्ष डॉलर्स— हीं कर्जें भारत सरकारच्या मर्जीप्रमाणें रुपयांत वा डॉलर्समध्यें फेडतां येतील. अमेरिकन कर्जांपैकीं ८० टक्के हिस्सा रुपयांत फेडतां येऊं शकतो.

"पब्लिक लॉच्या १ल्या कलमाखालीं गहूं, तांदूळ, कापूस, दुधाची भुकटी व तंबाखू इत्यादींचे प्रचंड सांठे अमेरिकेकडून भारताला मिळणार आहेत. या सर्व मालाची किंमत २३३७·३ दशलक्ष डॉलर्स होते. यांपैकीं ३००·८ दशलक्ष डॉलर्स किंमतीचें भारतीय चलन अमेरिकन सरकारच्या वापरासाठीं राखून ठेवलें आहे; १६२·३ दशलक्ष डॉलर्स खाजगी उद्योग-धंद्यांना कर्जरूपानें मिळणार आहेत; ७८८·२ दशलक्ष डॉलर्स भारताच्या आर्थिक विकासासाठीं आहेत व उरलेली (१०८६ दशलक्ष डॉलर्स) रक्कमहि आर्थिक विकासासाठींच भारत सरकारला मिळणार आहे. म्हणजे एकूण रकमेपैकीं ८० टक्के हिस्सा पाटबंधारे, वीज-योजना, शैक्षणिक व संशोधन कार्यांचा विस्तार, मलेरियाविरोधी मोहीम व याच स्वरूपाच्या इतर कामांकरितां देण्यांत येईल.

"पब्लिक लॉ ४८० च्या दुसऱ्या कलमाखालीं दुष्काळ व अन्य आणीबाणीच्या परिस्थितींत परदेशांना मदत करण्याचे अधिकार अमेरिकन राष्ट्राध्यक्षांना देण्यांत आले आहेत. ह्या कलमानुसार भारताला ४·९ दशलक्ष डॉलर्स किंमतीचीं अन्नधान्यें मिळालीं आहेत. अन्नधान्य परिस्थितीची तंगी कमी करण्याकरितां अमेरिकन आंतरराष्ट्रीय सहकार्य खात्यानें ५·५ दशलक्ष डॉलर्स किंमतीच्या धान्याचा पुरवठा केला आहे.

"तिसऱ्या कलमानुसार गहूं, तांदूळ, मका, कपाशीचें तेल, दुधाची भुकटी इत्यादि वस्तू (११६·८ दशलक्ष डॉलर्स किंमतीच्या) स्वयंसेवक संस्थांमार्फत वांटप करण्याकरितां म्हणून मिळाल्या आहेत."



अनुक्रमणिका






श्री व. भ. कर्णिक

# बर्लिनचा प्रश्न

बर्लिनच्या प्रश्नावरून जागतिक युद्धाचा भडका उडेल अशी परिस्थिति निर्माण झाल्याकारणानें, त्या प्रश्नाकडे सर्व सुजाण मंडळींचें लक्ष लागून राहिलें आहे. प्रश्न सुटला नाहीं आणि युद्ध सुरूं झालें तर तें बर्लिनपुरतें अगर जर्मनी व युरप यांच्यापुरतें मर्यादित राहणार नाहीं, सारें जग त्यामध्यें ओढलें जाईल आणि बहुशः सर्व जगाचा त्यामुळें संहार होईल या गोष्टीची पुरी जाणीव असल्याकारणानें सर्व जगभर त्या प्रश्नाची अत्यंत अगत्यानें आणि भीतियुक्त चित्तानें चर्चा केली जात आहे. आपल्या देशांतहि ती चर्चा थोडी-फार चालू असून उलट सुलट मतें मधून मधून व्यक्त केलीं जात आहेत.

कांहीं मंडळी निरागसपणें असें विचारतात, अहो, बर्लिनबद्दल रशियाचा एवढा हट्ट आहे, तर मग तें शहर त्यांना देऊन कां टाकूं नये ? बर्लिन त्यांच्या हवाली केलें तर युद्धाचा धोका तरी टळेल. बर्लिनची लोकसंख्या सरासरी तेवीस लाखांची, त्याचा विस्तार फार तर कांहीं चौरस मैलांचा—एवढ्या या लहान भू-भागासाठीं आणि तिथें राहणाऱ्या तेवीस लाख लोकांच्यासाठीं सबंध जगाला युद्धाच्या खाईंत कां लोटावें ? त्या ऐवजीं बर्लिनवर पाणी सोडावें आणि युद्धाचें संकट टाळावें.

या विचारसरणींतील दोष आहे तो हा कीं, बर्लिन घेऊन रशिया स्वस्थ बसेल ही खात्री कोण देऊं शकेल ? बर्लिननंतर सबंध पश्चिम जर्मनी आणि त्यानंतर युरप-मधील इतर सारे देश हस्तगत करण्याची हाव रशियाला कशावरून सुटणार नाहीं ? भक्ष्य पदरांत पडत गेलें कीं भूक वाढत जाते असा नेहमीचा अनुभव आहे. हिटलरच्या बाबतींत जगानें तो अनुभव एकदां घेतला आहे. सुडेटन प्रांत पदरांत पडला कीं त्याची भूक शमेल या कल्पनेनें १९३८ मध्यें म्युनिक येथें इंग्लंड व फ्रान्स यांनीं त्याच्याशीं करार केला. पण त्यामुळेंच त्याची भूक वाढली आणि वर्षभरांतच त्यानें जागतिक युद्धाला सुरवात केली हा इतिहास आतां सर्वांच्या परिचयाचा आहे. रशियापुढें नमतें धोरण स्वीकारलें तर त्याच इतिहासाची पुनरावृत्ति झाल्या-खेरीज राहणार नाहीं.

निर्भेळ आणि निखालस शांततावादी असें जें धोरण आहे त्याच्यांतील धोका आहे तो हाच. युद्ध टळावें म्हणून युद्धखोर राष्ट्रांच्या एकामागून एक अशा अनेक मागण्यांना मान्यता द्यावी लागेल आणि त्यामुळें त्यांची लालसा वाढून अखेर नको ती युद्धाची आपत्ति ओढ-वतेच. दरमान्यच्या काळांत युद्धखोर राष्ट्राचें सामर्थ्य वाढलेलें असतें आणि म्हणून युद्ध सुरू होतें त्यावेळीं तें जास्त भीषण व विनाशक स्वरूपाचें असें होतें. जगामध्यें शांतता नांदावी हें उद्दिष्ट चुकीचें आहे असें कोण म्हणेल ? पण शांततेइतकेंच राष्ट्रीय स्वातंत्र्य, लोकशाहीचे हक्क व मानवीं मूल्यें यांनाहि महत्त्व दिलें पाहिजे. त्यांच्याकडे दुर्लक्ष झालें तर जी शांतता लाभेल तिचें स्वरूप स्मशानांतील अगर कैदखान्यां-तील शांततेसारखी असण्याचा फार संभव आहे. म्हणून कांहींहि झालें तरी चालेल पण शांतता हवी असें म्हणण्याचा हट्ट कुणीहि धरूं नये.

शिवाय बर्लिनमधील तेवीस लाख लोकांचा बळी देण्याचा हक्क आपल्याला कितपत पोचतो याचा देखील आपण विचार केला पाहिजे. बर्लिनमधील लोकांनीं स्वतःच्या इच्छेनें आणि स्वतःच्या प्रयत्नांनीं लोकशाही मूल्यांवर आधारलेलें सुखी आणि स्वतंत्र जीवन स्वतःसाठी निर्माण केलें आहे. त्या जीवनाला त्यांनीं तिलांजली द्यावी व हुकूमशाहींतील गुलाम-गिरीचें जिणें पतकरावें असें त्यांना सांगण्याचा अधिकार कुणालाहि पोचत नाहीं. पटत नसेल अगर परवडत नसेल, तर त्यांना मदत करूं नये; पण आपल्या शांततेच्या आग्रहामुळें त्यांचे पाय मागें खेचले जाणार नाहींत एवढी मात्र काळजी घ्यावी.








बर्लिनचें बलिदान करून हा प्रश्न सुटण्यासारखा नसल्याकारणानें, तो सोडविण्याचे इतर मार्ग शोधले पाहिजेत. पण त्या मार्गांचा शोध घेण्यापूर्वी, या प्रश्नाची पूर्वपीठिका समजावून घेणें जरूरीचें आहे.

बर्लिनचा प्रश्न जो उपस्थित झाला आहे, तो जर्मनीच्या प्रश्नांतून. जर्मनीबरोबर तह झाला असता आणि युद्धापूर्वी जसें होतें तसें एक राष्ट्र म्हणून जर्मनीला मान्यता मिळाली असती तर त्या एकजीव राष्ट्राची राजधानी म्हणून बर्लिन नांदू लागलें असतें. मग बर्लिनशीं दळणवळण कसें ठेवावें अगर त्या शहरांतील लोकशाहीच्या संस्थांचें संरक्षण कसें करावें हे प्रश्न उपस्थित झाले नसते, कारण स्वतंत्र आणि सर्वाधिकारी अशा जर्मनजनतेनें स्वतःच्या विचारानें आणि सर्वांची सोय पाहून ते प्रश्न सोडवले असते. इंग्लंड, अमेरिका अगर रशिया यांना त्यांमध्यें लक्ष घालण्याचें प्रयोजन उरलें नसतें. या दृष्टीनें विचार केला, तर तितक्या लवकर जर्मनीबरोबर तहनामा करणें आणि युद्धोत्तर तात्पुरत्या अशा ज्या योजना अमलांत आल्या त्या बंद करणें हाच बर्लिनचा प्रश्न सोडविण्याचा साधा व सरळ मार्ग आहे हें कुणाच्याहि लक्षांत येईल.

पण रशियाच्या विरोधामुळें हा साधा आणि सरळ मार्ग तूर्ताला तरी बंद झाला आहे. जर्मनीच्या एकीकरणाला रशियाची तयारी नाहीं. गेल्या दहा बारा-वर्षांत रशिया व अमेरिका आदिकरून राष्ट्रें यांच्या तेढीमुळें जर्मनीची जी फाळणी झाली ती कायम स्वरूपाची समजण्यांत यावी व पूर्व जर्मनी व पश्चिम जर्मनी यांच्याशीं तीं दोन वेगळीं राष्ट्रें आहेत असें समजून दोन वेगळे तहनामे करावेत असें रशियाचें म्हणणें आहे. जर्मनीच्या या फाळणीला दोस्त राष्ट्रांची संमति नाहीं, व जर्मन जनतेची तर नाहींच नाहीं. दोस्त राष्ट्रांचें म्हणणें असें कीं स्वतःचें भवितव्य ठरविण्याचा अधिकार आपण जर्मन जनतेला देऊं या, मग ती स्वतःच्या मर्जीनुसार एकत्र राहण्याचें अगर विभक्त राहण्याचें ठरवूं शकेल. पण जर्मन जनतेला हा स्वयंनिर्णयाचा हक्क द्यायला रशिया तयार नाहीं आणि त्यामुळेंच युद्ध संपून पंधरा वर्षें उलटून गेलीं तरी जर्मनीबरोबर अद्याप तहनामा होत नाहीं.

हिटलरच्या पराभवानंतर इंग्लंड, अमेरिका, फ्रान्स व रशिया यांनीं जर्मनीचा कबजा घेतला तो युद्ध चालू असतांनाच त्यांच्यामध्यें जो करार झाला होता त्या करारान्वयें २७ सप्टेंबर १९४४ चा लंडन करार म्हणून तो करार प्रसिद्ध आहे. त्या कराराप्रमाणें जर्मनीच्या चार वेगवेगळ्या भागांवर त्या चार देशांच्या सैन्यांची हुकुमत सुरू झाली. राजधानी जी बर्लिन त्या शहरावर मात्र चारी सैन्यांची संयुक्त हुकुमत असावी असें ठरलें होतें. त्याप्रमाणें शहराचे चार भाग करून ते चारी सैन्यांना वेगवेगळे वाटून दिले. पण सबंध शहराच्या व्यवस्थेसाठीं म्हणून चारी सैन्यांच्या प्रमुखांचें एक संयुक्त मंडळ स्थापन केलें. ही सर्व योजना तात्पुरत्या स्वरूपाचीं आहे अशी त्यावेळीं सर्वांची कल्पना होती. कारण तहनामा लवकरच घडून येईल आणि एकसंघ असा देश जर्मन जनतेच्या हवाली करून चारी सैन्यांना आपआपल्या देशीं परत जातां येईल अशी अपेक्षा होती. परंतु १९४७ नंतर रशिया व इतर तीन राष्ट्रें यांच्यामधील वितुष्ट वाढत गेलें आणि तात्पुरत्या स्वरूपाची अशी जी देशाची विभागणी होती कायम स्वरूपाची बनूं लागली. १९५० च्या सुमारास इंग्लंड, अमेरिका व फ्रान्स यांच्या हुकमतीखालील प्रदेशांचें एकीकरण झालें व ते सर्व प्रदेश मिळून पश्चिम जर्मनीचें राज्य बनलें. त्याच्या कांहीं महिने अगोदर रशियन अमलाखालील प्रदेशाचें पूर्व जर्मनीच्या राज्यांत रूपांतर झालें होतें. तेव्हांपासून जर्मनीची जी फाळणी झाली ती आज तागायत कायम आहे.

त्याच सुमारास बर्लिनचीहि फाळणी झाली आणि त्या एका शहराचीं पश्चिम बर्लिन व पूर्व बर्लिन अशीं दोन शहरें बनलीं. दोन शहरें बनलीं तरी त्यांच्यामधील दळणवळण मात्र पूर्वीसारखेंच कायम राहिलें. दळणवळण कायम व अनिर्बंध ठेवण्याबद्दलचे अगोदरच करारमदार झाले होते. पूर्व जर्मनीनें नुकतेंच तें दळणवळण बंद पाडलें असून पूर्व बर्लिनच्या सीमेवर भिंती घालून व काटेरी कुंपणें उभारून आपल्या भागांतील लोकांना पश्चिम बर्लिनमध्यें जाण्याची बंदी केली आहे. पूर्व जर्मन सरकारचें हें कृत्य त्या करारमदारांविरुद्ध असून मानवी स्वातंत्र्यावरील व हक्कांवरील तो एक अत्यंत










निर्लज्ज असा हल्ला आहे. पश्चिम बर्लिनमधील दोस्त राष्ट्रांच्या अधिकाऱ्यांनीं त्या कृत्याविरुद्ध रशियन अधिकाऱ्याकडे तक्रार केली, पण त्या तक्रारीचा अद्याप तरी कांहीं उपयोग झालेला नाहीं.

जर्मनीच्या फाळणीनंतर बर्लिन शहराची परिस्थिती मोठी बिकट आणि नाजूक झाली. बर्लिन हें जर्मनीच्या रशियनव्याप्त अशा प्रदेशांत आहे. पश्चिम जर्मनींतून बर्लिनला जायचें म्हणजे जवळ जवळ शंभर मैलांचा रस्ता त्या प्रदेशांतून काटून जावें लागतें. पश्चिम बर्लिनच्या आंवतीभोवतीं पूर्व जर्मनीचा प्रदेश असून, त्या प्रदेशांतील तें एक एकाकी असें बेट आहे. म्हणून पश्चिम बर्लिनचें पश्चिम जर्मनीशीं व जगाशीं दळण-वळण कायम ठेवण्याबद्दलचे खास करार दोस्त राष्ट्रें आणि रशिया यांच्यामध्यें घडून आले. त्या करारान्वयें तें दळणवळण खुलें राहील व रस्त्याच्या अगर काल-व्यांच्या मार्गानें असो किंवा आकाशमार्गें असो त्यामध्यें व्यत्यय येणार नाहीं असें आश्वासन रशियाच्या तर्फे देण्यांत आलें. हे करार १९४७ साली घडून आले.

पण वर्ष पुरें होतें न होतें तोंच रशियानें त्या करा-रांचा भंग केला. जून १९४८ मध्यें रस्त्यांचा व काल-व्यांचा मार्ग रोखून रशियानें पश्चिम बर्लिनची नाकेबंदी केली. रशियाच्या या कृत्यामुळें परिस्थिती कांहीं काळ मोठी नाजूक झाली होती. दोस्त राष्ट्रांना बळाचा वापर करून नाकेबंदी तोडतां आली असती, पण त्यामुळें महायुद्ध ओढवलें असतें. म्हणून त्यांनीं शांत-पणें विचार करून तो मार्ग टाळला आणि विमानांच्या साहाय्यानें बर्लिनला मालाचा पुरवठा करण्याचें ठरविलें. रशियानें विमानांच्या वाहतुकींत अडथळा आणला नाहीं. ती वाहतुक रात्रंदिवस चालू राहिली आणि त्या पराक्रमी प्रयत्नांमुळें पश्चिम बर्लिनची नाकेबंदी कर-ण्याचा रशियाचा डाव यशस्वी झाला नाहीं. तरी देखील मे १९४९ पर्यंत रशियानें ती नाकेबंदी कायम ठेवली. ती उठवली त्यावेळीं पुन्हा एकदां रशिया व दोस्त राष्ट्रें यांच्यामध्यें करार झाला आणि बर्लिनचें पश्चिम बर्लिनशीं व बाहेरच्या जगाशीं दळणवळण कायमचें खुलें रहावें असें ठरलें.

या बाबतींत पंतप्रधान नेहरू याच्या राज्यसभेंतील एका भाषणामुळें कांहीं गैरसमज निर्माण झाले होते. दोस्त राष्ट्रांना बर्लिनमध्यें राहण्याचा कायदेशीर हक्क नाहीं असें पंतप्रधानांनीं एक विधान केलें होतें. त्या विधानामुळें परदेशांतहि बरीच खळबळ माजली होती. पं. नेहरूंचा रशियन भूमिकेला पाठिंबा आहे कीं काय अशी धास्ती पुष्कळांना त्या वेळीं वाटूं लागली होती. पण पंडितजींनीं लवकरच खुलासा करून तो गैरसमज दूर केला. बर्लिनचें स्वातंत्र्य व दळणवळणाचे हक्क अबाधित राहिले पाहिजेत अशी त्यांची देखील भूमिका आहे. हे दळणवळणाचे हक्क केवळ अमूर्त अशा मानवी स्वातंत्र्याच्या कल्पनांवर आधारलेले नसून, त्यांना आंतरराष्ट्रीय कारारमदारांचा भरभक्कम कायदेशीर आधार आहे, हें देखील त्यांनीं ध्यानांत ठेवावें. पंतप्रधान नेहरूंसारख्या माणसानें या आंतर-राष्ट्रीय पेचप्रसंगाच्या क्षणीं अत्यंत जपून बोललें पाहिजे आणि आपल्या गैरसावध विधानांनीं सत्याचा अपलाप होणार नाहीं अशी खबरदारी घेतली पाहिजे.

फाळणीनंतर जर्मनीच्या पश्चिम व पूर्व या दोन भागांची वाढ झाली ती दोन वेगवेगळ्या दिशांनीं. पश्चिम जर्मनीमध्यें लोकशाहीच्या संस्था वाढल्या. तिथें भांडवलदारी पद्धतीनें उद्योगधंद्यांची वाढ झाली. उद्योगधंद्यांच्या वाढीमुळें कामगारांची व सामान्य जन-तेचीहि परिस्थिती सुधारली. युद्धकाळांत नष्ट झालेले सारे उद्योगधंदे आतां तिथें पुन्हा सुरू झाले असून कामगारांना वाढता रोजगार व मजूरी मिळत आहे व देशाची सारखी भरभराट होत आहे. पूर्व जर्मनींत कम्युनिस्टांची राजवट आहे. रशियाच्या दडपणामुळें त्या भागांतील जर्मन जनतेला वेगळा मार्ग स्वीकारणें शक्यच नव्हतें, तेथील आर्थिक व्यवहार जे चालले आहेत ते कम्युनिस्ट तंत्रानुसार; आणि रशियाची सोय पहावयाची हें बंधन असल्याकारणानें, उद्योगधंद्यांची तिथें व्हावी तशी वाढ होऊं शकली नाहीं. त्यामुळें कामगारांच्या व सामान्य जनतेच्या परिस्थितींत सुधा-रणा झाली नाहीं. तिथें जनतेला आपलीं गाऱ्हाणीं उघडपणें सांगण्याची सोय नाहीं. पण रोज अंदाजें १०००–५०० या संख्येनें तिथून गेलीं अनेक वर्षें पश्चिम बर्लिनच्या मार्गानें अनेक लोक पळून येत आहेत त्यावरून तेथील जनतेची मनःस्थिती उघड होते. अशा तऱ्हेनें गेल्या दहा वर्षांत पळून आलेल्यांची संख्या आतां ३३ लाखांवर गेली आहे.








पश्चिम व पूर्व जर्मनीची घडण जशी दोन वेगळ्या तऱ्हेनीं घडली, तोच प्रकार पश्चिम व पूर्व बर्लिन मधेंहि घडून आला. सबंध शहराची व्यवस्था एकसूत्री-पणानें चालावी अशी सुरवातीची योजना होती. त्याप्रमाणे शहराच्या व्यवस्थेसाठीं शहर समिती बनवावी म्हणून २० ऑक्टोबर १९४६ रोजी सबंध शहरभर निवडणूक झाली. त्या निवडणूकीमध्यें कम्युनिस्टांना १३० पैकी फक्त २६ जागा मिळाल्या. बहुमत आपल्या बाजूनें नाहीं हें पाहतांच रशियानें त्या निवडणुकीला मान्यता देण्याचें नाकारलें. त्यानंतर पूर्व बर्लिनच्या आपल्या अंमलाखालील भागांत त्यांनीं आपला सवता सुभा स्थापन केला. पश्चिम बर्लिननें लोकशाहीचा मार्ग स्वीकारला, तर पूर्व बर्लिनला कम्युनिस्ट मार्ग स्वीकारावा लागला. त्या मार्गांची प्रात्यक्षिकें आज त्या एकाच शहराच्या दोन विभागांत शेजारी शेजारी दृष्टीस पडत आहेत. तीं प्रात्यक्षिकें उघड्या डोळ्यांनीं पाहिल्यानंतर कुणालाहि कम्युनिस्ट राजवट हवीशी वाटणार नाहीं, अशी खात्री पटल्यामुळेंच पश्चिम बर्लिनमधील लोकशाहीचें स्वतंत्र व संपन्न जीवन रशियन राज्यकर्त्यांच्या डोळ्यांत सुईसारखें खुपूं लागलें. तें जीवन नष्ट करावें अशी त्यांची कित्येक वर्षांपासून खटपट चालू आहे. सध्या जो त्यांनीं पवित्रा टाकला आहे तो मुख्यत्वें-करून त्याच हेतूनें: नष्ट करण्याचा हेतू कधीं साध्य होईल तो होवो, तूर्त तरी निदान तें आपल्या लोकांच्या दृष्टीस पडूं नये या कल्पनेनेंच त्यांनीं बहुतेक पूर्व बर्लिनच्या सीमेवरील त्या भिंती व तीं काटेरी कुंपणें उभारलीं असावींत.

आजचा जो पेचप्रसंग उद्भवला आहे तो, वर्ष-अखेरपर्यंत समेट झाला नाहीं, तर आम्ही पूर्व जर्मन सरकारबरोबर वेगळा तहनामा करूं व त्या तहनाम्यानंतर युद्धांतील विजयामुळें विजयी राष्ट्रांना ज्या सवलती मिळाल्या त्यांचा अंत होईल या रशियाच्या घोषणेमुळें. पश्चिम बर्लिनबद्दल या घोषणेंत स्पष्ट असा उल्लेख नाहीं. पण तिचा मथितार्थ आहे तो हा कीं तहनाम्यानंतर पश्चिम बर्लिनमध्यें सैन्य ठेवण्याबद्दल व दळणवळणाचे हक्क कायम राखण्याबद्दल दोस्त राष्ट्रांना करारा करावा लागतील त्या पूर्व जर्मनीच्या सरकारबरोबर. रशिया, अमेरिका, फ्रान्स व इंग्लंड या विजयी राष्ट्रांनीं आपआपसांत केलेले करारमदार त्यावेळीं संपुष्टांत येतील आणि सार्वभौम अशा पूर्व जर्मनीच्या सरकारबरोबर त्यांना नवे करार करावे लागतील.

याच तऱ्हेची घोषणा रशियानें दोन वर्षांपूर्वी केली होती. त्यावेळीहि अशीच मुदत दिली होती. पश्चिम बर्लिन मधील जनतेचें रशियाच्या या धोरणाबद्दलचें मत ७ डिसेंबर १९५८ रोजी तिथे जी निवडणूक झाली त्या निवडणुकीमध्यें जाहीर झालें. निवडणुकीमध्यें ९३ टक्के लोकांनीं भाग घेतला होता आणि रशियन धोरणाला पाठिंबा देणाऱ्या कम्युनिस्टांना फक्त १·९ टक्के मतें मिळालीं. या मतप्रदर्शनामुळें असो किंवा दुसऱ्या कोणच्याहि कारणामुळें असो, कांहीं काळानंतर रशियानें आपला आग्रह सोडला आणि घोषणेची अंमलबजावणी केली नाहीं. यावेळी तसा प्रकार घडेल अशी आशा बाळगणें चुकीचें ठरेल. या वेळी रशियानें बरीच तयारी केली आहे असें दिसतें आणि उक्तीप्रमाणें कृती केली नाहीं तर आपली पत जाईल ही धास्तीहि कम्युनिस्ट राज्यकर्त्यांना कार्यान्वित केल्यावाचून राहणार नाहीं.

रशियन घोषणेंतील मोठा दोष आहे तो हा कीं चौघांनीं मिळून केलेले करार रशिया स्वतःच्या एकट्याच्या कृतीनें मोडूं पहात आहे. हा प्रकार सुरू झाला तर आंतरराष्ट्रीय करारमदारांना महत्व व किंमत उरणार नाहीं. आंतरराष्ट्रीय नीतीच्या दृष्टीनें हा प्रकार अत्यंत गर्ह्य आहे. दुसरा दोष हा कीं रशियाच्या या भूमिकेमुळें जर्मनी कायमचा दुभंगला जातो. तिसरा दोष हा कीं पश्चिम बर्लिनचें स्वातंत्र्य व लोकशाही जीवन धोक्यांत येतें. पूर्व जर्मनींतील कम्युनिस्ट सरकारच्या कृपेवर तें अवलंबून ठेवायचें म्हणजे वाघाच्या पिंजऱ्यांत तूं निर्धास्तपणें रहा असें शेळीला सांगण्यासारखें आहे. पूर्व जर्मनीबरोबर रशियानें वेगळा तहनामा केला तर दोस्त राष्ट्रांना त्याबद्दल विशेष विषाद वाटण्याचें कारण नाहीं. कम्युनिस्ट राष्ट्रांनीं आपआपसांत कसे संबंध ठेवावे हें त्यांचें त्यांनीं पहावें. दोस्त राष्ट्रांचा कटाक्ष आहे तो पश्चिम बर्लिनच्या स्वातंत्र्यावर आणि








पश्चिम जर्मनीशीं व जगाशीं त्याचें दळणवळण खुलें आणि अबाधित राखण्यावर. हा हेतू साधणें हेंच त्यांचें आजचें उद्दिष्ट आहे.

या बाबतींत समाधानाची गोष्ट एवढीच कीं रशियानें समेटाचा दरवाजा खुला ठेवला आहे, तसेंच पश्चिम बर्लिनचें आजचें दळणवळण पूर्वीसारखेंच ठेवण्याचा आपला मनोदयहि व्यक्त केला आहे. पश्चिम बर्लिन हें एक "स्वतंत्र शहर" ( free city ) म्हणून रहावें असें रशियानें सुचविलें आहे. पण रशियाच्या स्वतंत्र शहराच्या कल्पनेचें स्वरूप तपासून पाहिलें पाहिजे. तरीदेखील रशियाच्या या भूमिकेचा फायदा घेऊन दोस्त राष्ट्रांनीं समेटाचीं बोलणीं शक्य तितक्या लवकर सुरू करावीं. समेटाच्या बोलण्यांत जर्मनीचें एकीकरण साधण्याचा सुरवातीला कसोशीचा प्रयत्न व्हावा. जर्मन एकीकरणाच्या बाबतींत रशियाच्या ज्या अडचणी आहेत त्या लक्षांत घेणें जरूरीचें आहे. रशियाला व पूर्व युरपमधील इतर राष्ट्रांना जर्मनीची धास्ती वाटते हें सत्य डोळ्याआड करण्यांत हंशील नाहीं. म्हणून जर्मनीचें शस्त्रबल वाढणार नाहीं अशी त्यांना खात्री द्यावी लागेल. तसेंच जरूर तर आजच्या राष्ट्रगटांच्या लढ्यांत जर्मनीनें तटस्थ रहावें या गोष्टीला देखील मान्यता द्यावी लागेल. आणि अखेरीस ऑडर व निसेन या नद्यांच्या बाजूनें जर्मनीची आजची जी सीमारेषा आहे तिलाहि मान्यता द्यावी लागेल. या आश्वासनानंतर रशियाची व पूर्व युरपमधील इतर राष्ट्रांची जर्मनीबद्दलची धास्ती दूर व्हावी आणि त्यांनीं जर्मन एकीकरणाला विरोध करूं नये. यापुढेंहि त्यांचा विरोध कायम राहिला तर तो केवळ कम्युनिझमच्या प्रसाराच्या हव्यासामुळेंच असाच त्याचा अर्थ करावा लागेल. पूर्व युरपमधील व पूर्व जर्मनींतील जनतेपुढें ही गोष्ट एकदा स्पष्ट होणें फार जरूरीचें आहे.

जर्मन एकीकरण्याचे हे सर्व प्रयत्न फसल्यानंतर केवळ आपधर्म म्हणून दोस्त राष्ट्रांना पूर्व जर्मनीला मान्यता द्यावी लागेल. आजच्या जगांत कम्युनिष्टांच्या दांडगाईमुळें इतरहि कांहीं राष्ट्रांच्या फाळणीला मान्यता द्यावी लागली आहे. तोच प्रकार जर्मनीच्या बाबतींत घडतो आहे असें म्हणावें लागेल. जर्मनीच्या बाबतींत आनंदाची गोष्ट ही कीं ही फाळणी फार वर्षें टिकणार नाहीं. कारण जर्मन जनतेची एकत्र येऊन एक राष्ट्र म्हणून नांदण्याची इच्छा दुर्दम्य आहे. आज ना उद्या ती प्रभावी ठरल्यावाचून राहणार नाहीं. शिवाय पूर्व जर्मनींतील कम्युनिस्ट सरकार आजच जनतेपासून अलग पडलें आहे. रशियानें आपलें सैन्य काढून घेतल्यानंतर तें किती दिवस नांदू शकेल तें आज सांगणें कठीण आहे. स्वतंत्र झाल्यानंतर एकीकरणाला विरोध करणें त्याला फार जड जाईल आणि मग कदाचित् त्यालाच स्वतः त्या दिशेनें पावलें टाकावीं लागतील.

समेटामध्यें तडजोड जी अशक्य आहे ती पश्चिम बर्लिनच्या प्रश्नाबाबतीत. पश्चिम बर्लिनची आज जी स्थिती आहे ती तशीच कायम राहिली पाहिजे. तें शहर हा एक पश्चिम जर्मनीचा अविभाज्य भाग आहे. तो तसाच राहिला पाहिजे आणि त्याचें पश्चिम जर्मनीशीं व जगाशीं जें दळणवळण आहे तें तसेंच कायम राहिलें पाहिजे. त्या शहरांतील लोकशाहीच्या संस्था आज आहेत तशाच अबाधित राहिल्या पाहिजेत. यांपैकीं कोणत्याहि गोष्टीच्या बाबतींत तडजोड अगर देवाणघेवाण होतां कामा नये. हे जनतेचे बहुमोल असे हक्क आहेत. त्यांचें दान करण्याचा अगर त्यांच्यावर निर्बंध घालून त्यांचें महत्त्व कमी करण्याचा राजकारणी पुरुषांना अधिकार नाहीं. म्हणून पश्चिम बर्लिनच्या स्वातंत्र्याच्या प्रश्नाच्या बाबतींत दोस्त राष्ट्रांच्या पुढाऱ्यांनीं खंबीर भूमिका घेतली पाहिजे. हा प्रश्न असा आहे कीं ज्याच्यासाठीं युद्धाचा धोका पतकरण्याची देखील तयारी ठेवली पाहिजे. दुसरी बाजू इतकी खंबीर आहे हें दृष्टींस पडलें कीं रशियादेखील विशेष हट्ट धरणार नाहीं आणि मग संयुक्त राष्ट्र संघटनेसारख्या एखाद्या संस्थेमार्फत पश्चिम बर्लिनबद्दल सर्व राष्ट्रांना बंधनकारक असा त्याचें स्वातंत्र्य अबाधित राखणारा नवा करार घडवून आणतां येईल.

बर्लिनच्या प्रश्नामुळें निर्माण झालेली परिस्थिति अत्यंत नाजूक आणि गंभीर आहे. अशा वेळीं मला काय त्याचें अशी उपेक्षा वृत्ति ठेवून किंवा मोठ्या राष्ट्रांच्या या धकाधकींत आपण काय करणार अशी दुबळी वृत्ति ठेवून भागणार नाहीं. आजच्या जगांत










लोकमत ही देखील एक प्रभावी अशी शक्ती आहे. शक्तिशाली अशा राष्ट्रांना देखील तिच्याकडे दुर्लक्ष करतां येत नाहीं. बर्लिनच्या प्रश्नाच्या बाबतींत लोकमतानें विशेषतः भारतासारख्या स्वतंत्र वृत्तीनें आंतरराष्ट्रीय प्रश्नांकडे पाहणाऱ्या देशांतील लोकमतानें, निःसंदिग्ध असा कौल दिला तर रशियाला देखील आपल्या धोरणाचा फेरविचार करावा लागेल. म्हणूनच या प्रश्नाची निर्विकार बुद्धीनें साधकबाधक चर्चा होणें फार अगत्याचें आहे.

त्या चर्चेला उपयोगी पडतील असे कांहीं मुद्दे या लेखाच्या द्वारें नवभारताच्या वाचकांपुढें सादर केले आहेत.

---





अनुक्रमणिका








श्री. श्री. रा. टिकेकर

# स्वातंत्र्य चळवळीचा इतिहास

**स्वातंत्र्य चळवळीचा इतिहास :** (इंग्रजी) खंड १ ला, ले. ताराचंद प्र. पब्लिकेशन डिव्हिजन. भारत सरकार– दिल्ली ६. रु. १०·५० पृ. ४००.

" **रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळालें ?** " असा प्रश्न कवीनें केला तेव्हां त्याचें अपेक्षित उत्तर " कुणाला नाहीं " हें होतें. पण आम्हांला– भारतांतील व पाकिस्तानांतील– ३०–३५ कोट जनतेला स्वातंत्र्य **रणावांचून** मिळालें ही गोष्ट अपवादात्मक समजावी. जुन्या जमान्यांत तर असेंहि प्रतिपादीत कीं राजकारणाच्या शेवटीं " रण " आहे. ब्रिटिश राष्ट्रकुटुंबांतल्या अनेक राष्ट्रांना गेल्या १०–१२ वर्षांत भराभर स्वातंत्र्य मिळालें हीहि सत्य घटना असल्यानें प्रारंभीचा कवि–प्रश्न हा जुन्या राजवटीचा द्योतक समजावा. सध्यां **रणावांचून** स्वातंत्र्य मिळ(वि)ण्याचा शिरस्ता रूढ होत आहे.

स्वातंत्र्य ' रणावीण ' मिळालें असलें तरी त्यासाठीं केलेली चळवळ, खटपट, प्रयत्न ... अशांचें महत्त्व कमी होत नाहीं. म्हणून स्वराज्यप्राप्तीनंतर आमच्याकडे स्वातंत्र्य चळवळीचा इतिहास लिहिण्यासाठीं दिल्लीस मध्यवर्ती आणि इतर ठिकाणीं राज्यांचा, असा इतिहास लिहिंण्यासाठीं साधनें जमा होऊं लागलीं. त्या साधनांचे खंड प्रसिद्ध झाले. कॉंग्रेस पक्षानेंहि आपल्यापरी साहित्य जमविलें... पण अफसोस ! दिल्लींतल्या संपादकांचें आणि मौलाना आझाद यांचें कशावरून तरी बिनसलें — आणि ह्या संपादकांनीं राजिनामा दिला – त्यांनीं जमविलेलें साहित्य राष्ट्रीय दप्तरखान्यांत जाऊन पडलें. स. १९५७ मध्यें तयार होणाऱ्या या इतिहासाची योजना एकदम बारगळली. मग डॉ० सुरेंद्रनाथ सेन यांजकडून लिहविलेल्या " १८५७ " ह्या नव्या पुस्तकाचें प्रकाशन तेवढें त्या शंभरीच्या निमित्तानें लोकांना उपलब्ध करून दिलें. त्यानंतर साडेतीन वर्षांनीं हा प्रथमखंड हातीं येत आहे. इराणमधील वकिली सांभाळून परत आलेल्या डॉ. ताराचंदांना हें काम दिलें, कीं त्यांनीं तें आपण होऊन पत्करलें – ठाऊक नाहीं. पण एकीकडे राज्यसभेचे प्रतिनिधी झालेले हे प्रयागचे प्रोफेसर, स्वातंत्र्य चळवळीचा इतिहास लिहिणारेहि नेमले – ही एक चलाखी म्हटली पाहिजे. त्यांची कचेरी दिल्लीच्या ' राष्ट्रीय ' दप्तरखान्यांत आहे, तेव्हां पूर्वसूरींनीं जमविलेलें साहित्य त्यांनीं पाहिलें असावें हा रास्त तर्क सपशेल चुकीचा ठरेल. किंबहुना तें साहित्य " अस्पर्श " मानून चालावें असा ह्या नव्या विटीचा, नव्या संपादकीय राज्याचा दंडक आहे.

पुस्तकपरीक्षणाचें नमन इतकें लांबलें आणि त्यासाठीं घडाभर तेल खर्च झालें. याचें कारण आमच्या त्याबाबत अपेक्षा काय आहेत; त्या उंचावल्या कां, इत्यादि वस्तुस्थितीची जाणीव व्हावी. त्या उंचावलेल्या अपेक्षा सपशेल पडतात. एकदेखील अंशतः फलद्रूप होत नाहीं. हा गैरसमजाचा परिणाम आहे— ह्या मतभेदाचा परिपाक आहे. स्वातंत्र्य चळवळीचा इतिहास म्हणतांच बहुसंख्य वाचकांना जें अभिप्रेत आहे, त्यांतील एक शतांशहि प्रो० ताराचंद यांच्या मनांत नाहीं. लेखक–वाचक यांचें ऐकमत्य फक्त एकेच ठिकाणीं साधतें– पुस्तकाच्या नांवाबद्दल. त्यावरून असें वाटतें कीं एरवीं पुस्तकाकडे कुणी पाहिलें नसतें– तें ह्या मोहक नांवामुळें तरी पहातील– अशा हेतूनें हें पुस्तक– त्याचें हें नांव कायम ठेवलें. त्यामुळें वाचकांची फसगत मात्र होते.

भारतीय स्वातंत्र्याचा (च्या चळवळीचा) हा इतिहास कुठून सांगण्यास सुरुवात करावी ? असा प्रश्न प्रो. ताराचंद यांना पडला. प्लासी, १८५७ किंवा राष्ट्रसभेची स्थापना ह्या तिन्हींपैकीं कोणत्याहि घटनेपासून प्रारंभ करून– ऐतिहासिक समालोचना थोडक्यांत आटोपून– प्रत्यक्ष चळवळीस आरंभ झाला ते प्रसंग क्रमाक्रमानें चर्चेसाठीं, इतिहास कथनासाठीं निवडावे, ही आम्हां



अनुक्रमणिका

वाचकांची अपेक्षा. पण प्रो. ताराचंदाची दृष्टि ' सबसे न्यारी. ' त्यांनीं सूक्ष्मदर्शक यंत्रांतून या प्रश्नाची तपासणी केलेली. प्रथम स्वराज्य, स्वातंत्र्य ( फ्रीडन्, इंडिपेंडन्स ) या शब्दांतील सूक्ष्मतर भेद त्यांनीं हुडकला. एकांत ( इंडिपेंडन्समध्यें ) नकारात्मक अर्थ अभिप्रेत आहे. म्हणजे स्वतंत्र असलेल्यांना स्वराज्य लाभलेलें आहेच असें नव्हे. हा वकिली शाब्दिक वाद आम्हांला काय करावयाचा ? आम्हीं स. १९४७ पर्यंत काय काय चळवळी केल्या– ज्या योगानें आम्ही स्वतंत्र झालों. त्यांचा इतिहास सांगण्याचें टाळून प्रो. ताराचंद भलतीच कथा– भलतेंच गुन्हाळ– आमच्यापुढें लावून बसले आहेत. त्याला काय करावें ? त्यांच्या गुन्हाळांत काय काय विषय आले आहेत ते तर पहा–

प्रस्तावादाखल ४४ पृ. खर्ची पडलीं आहेत. हूण, शक, पल्लव यांच्या स्वाऱ्यांपर्यंत नजर मागें फेकली असून युरोपमध्यें राष्ट्रीयत्वाचा विचार केव्हां सुरू झाला याचा इतिहास नंतर सांगितला आहे. पण तो सांगण्यासाठीं सरंजामशाही– तींतील खेडीं, शहरें, त्यावेळची लष्करी व्यवस्था ...... ब्रिटिश स्थानिक स्वराज्य, व्यापाराची वाढ, ... ( कुठें हरवली भारतीय स्वातंत्र्य चळवळ ? ) औद्योगिक क्रांति...युरोपमधील नवे वारे यांचा मागोवा घेतां घेतां हा प्रस्ताव संपतो.

पुस्तकांतील पहिलें प्रकरण पुनः ऐतिहासिक आहे. मोगलसाम्राज्याची उतरती कमान– अस्त– अशा व्यापक प्रकरणांत काय काय आलें असावें– जदुनाथ सरकारांच्या ग्रंथांतील पुष्कळ उतारे पावलोपावलीं घेतले असावे, हें सहज समजतें. या २५ पानांच्या प्रकरणांत वादग्रस्त असा उल्लेख मराठ्यांबद्दल आढळतो. त्याचा विचार वेगळा करूं. पण दुसरें प्रकरण आधीं पाहूं. " अठराव्या शतकांतील समाज संघटना " या पायीं ५६ पृ. खर्ची पडतात.

कारण कुठलाहि विषय विवेचनास घ्यायचा म्हणजे अगदीं मुळापासून त्याचा इतिहास सांगावा अशी आमच्या प्रयागी प्रोफेसरांची रीत. अठराव्या शतकांतली परिस्थिती सांगावयाची म्हणजे, पहिल्या १७ शतकांबद्दल कांहींच कां लिहूं नये ? आणि ज्या देशाचा १७–१८ शतकांचा इतिहास ' विहंगम ' दृष्टीनें पहावयाचा, त्या देशाचें वर्णन तरी केलें पाहिजे–म्हणून प्रथम देश, नंतर लोक, मग त्यांच्या जाती, रानटी टोळ्या, खेडीं, खेड्यांची स्वयंपूर्ण व्यवस्था, असा सर्व इतिहास आला. येथपर्यंत प्रथमखंडाचीं सवाशें पानें संपून गेलीं. पण स्वातंत्र्य चळवळीला सुरुवात कुठें झाली ? सबूर. सबूर......

तिसऱ्या प्रकरणांत राज्यपद्धतींची चर्चा आहे. राज्य, न्यायपद्धति, राज्यकारभार, जनता, राज्यकर्त्यांचें नाकर्तेपण, जाट, मराठे, आणि शीख...अशांचा समाचार चावऱ्या, बोचऱ्या पद्धतीनें घेतल्यावर पुन्हा अठराव्या शतकांतील आर्थिकव्यवस्था सांगण्यासाठीं नवें चौथें प्रकरण सुरू होतें ( पृ. १७२ ). घरगुती धंदे, व्यापार, पेढ्या, सावकारी, कारखाने, दलाल, मजुरीचे दर...अशांचा विचार करतां करतां चौथें प्रकरण संपलें ( पृ. १९६ ). पांचव्या प्रकरणांत सांस्कृतिक जीवन, शिक्षण, कला, साहित्य इत्यादिकांच्या शोधांत बरींच पानें खर्ची पडलीं. पण त्यांत इस्लामी शिकवण, इस्लामी धर्मीयांचे पंथ, यांवर अधिक भर आहे. शहा वलीउल्लाची महति यांतच आढळते. मग विवेचनाचा ओघ मध्येंच ब्राह्मणी शिकवणीकडे वळला. पाणिनी, रघुनंदन, जीमूतवाहन, मनु इत्यादि नांवांचा– त्या त्या ग्रंथांचा घोटाळा याच प्रकरणांत आढळतो. मोगलबादशाहीच्या वैभवाचे गोडवे गातांना प्रो. ताराचंदांची तन्मयता विशेष साधते. मात्र हिंदू धर्मग्रंथ, पढिक विद्वान ग्रंथकार–यांबद्दल ते थोडेसे उदासीन दिसतात. येथपर्यंत सवादोनशें पृष्ठें संपलीं. अद्याप स्वातंत्र्य चळवळीचा उल्लेखहि नाहीं !!

सहावें प्रकरण ब्रिटिशांसंबंधीं असून हिंदुस्थान त्यांनीं " जिंकून " घेतला असें सूचित आहे. तो कसा जिंकला हें सांगतांना इ. स. १३१३ ( तेराशें तेरा ! ) मध्यें लोकरीचा व्यापार ब्रिटनमध्यें कसा चालत होता याचा निर्देश आढळतो. इतक्या सूक्ष्म आणि मूलगामी पद्धतीनें भारतीय स्वातंत्र्याचा इतिहास लिहावयाचा तर मानवसमाजाच्या उत्पत्तीपासून त्या निवेदनाला प्रारंभ झाला नाहीं, हें वाचकांचें महद्भाग्य होय !

ह्या प्रकरणांत ईस्ट इं. कं. ची स्थापना; तिचे प्रतिस्पर्धी, तिचा कारभार, कार्याचा विस्तार इत्यादि कंपनीपुराण तर आहेच. पण फ्रेंच-ब्रिटिश स्पर्धा, बंगालची दिवाणी, त्या दिवाणीच्या आधारावर पुढील









अनुक्रमणिका

स्वातंत्र्य चळवळीचा इतिहास

## राज्य सरकारांचीं प्रकाशनें

### १ महाराष्ट्र ( मुंबई )

खंड १ : स. १८१८–८५ पृ. ३९७ :
मुंबई (१९५७) सं. प्रो. एम्. आर. पाळंदे
खंड २ : स. १८८५–१९२० पृ. १०१५
मुंबई ( १९५८ )

### २ मध्य प्रदेश ( मध्यप्रांत )

खंड १ नागपुर ( १९५६ ) पृ. ४९८
( संपादक-मंडळ )

### ३ हैदराबाद

खंड १ स. १८००–५७ पृ. २२८
हैदराबाद ( १९५६ )
खंड २ स. १८५७–८५ पृ. ३३२
हैदराबाद ( १९५६ )
( संपादक श्री. सेतुमाधवराव पगडी )

### ४ बिहार

खंड १ : स. १८५७–१९२८ पृ. ६७०
पटणा ( १९५७ ) सं. डॉ. के. के. दत्त
खंड २ : स. १९२८–४१ पृ. ५२९
पटणा ( १९५७ ) सं. डॉ. के. के. दत्त
खंड ३ : स. १९४२–४७ पृ. ४७८
पटणा ( १९५८ ) सं. डॉ. के. के. दत्त

### ५ ओरिसा

खंड १ : स. १७५७–१८५६ पृ. १९५
सं. सुशील चंद्रडे
खंड २ : स. १८५७–१९११ पृ. १४२
सं. प्रभात मुखोपाध्याय
खंड ३ : स. १९११–३० पृ. १७८
सं. सुधाकर पट्टनायक
खंड ४ : स. १९३०–४७ पृ. २६५
सं. घनःश्याम दास
प्रकाशन : कटक–१९५७
सर संपादक– डॉ. हरेकृष्ण मेहताब

### ६ उत्तर प्रदेश

खंड १ : स. १८५७-५९ पृ. ५१४
लखनौ (१९५७) सं. रिझवी आणि भार्गव
खंड २
लखनौ (१९५८) : सं. १८५७–५९ (अवध)
पृ. ७३६ सं. रिझवी आणि भार्गव
खंड ३
लखनौ : स. १८५७–५९ ( बुंदेलखंड )
पृ. ७६७ सं. रिझवी आणि भार्गव
खंड ४
लखनौ ( १९५९ ) : सं. १८५७–५९
( पूर्वेकडील )
पृ. ९५८ सं. एस्. ए. ए. रिझवी
खंड ५
लखनौ ( १९६० ) स. १८५७–५९
( रोहिलखंड )
पृ. ११०८ सं. एस्. ए. ए. रिझवी

मुंबईत एवढीच माहिती दोन तीन ग्रंथालयांत मिळून मिळाली. ही यादी कुणींतरी अभ्यासूनें पुरी करावी.

वाढ, निजाम, म्हैसूर व मराठे हीं पोट–प्रकरणें, सिंध आणि पंजाब यांचा समावेश इत्यादि राजकारणें सांगितल्यावर हें प्रकरण संपतें ( पृ. २७० ).

ब्रिटिश ( कंपनी ) कारभाराची वाढ ही सातव्या प्रकरणांत ( स. १७९३ पर्यंत ) वर्णिली आहे. प्लासी नंतर काय झालें. वॉरन हेस्टिंग्जचा प्रताप, पिट्चें इंडिया बिल, कॉर्नवालिसची कारकीर्द, हिंदी कारभारांत भारतीयांना मज्जाव इत्यादि प्रकार सांगून हें प्रकरण संपविलें आहे ( पृ. ३०९ ), अद्याप मूळ विषयाचा जन्ममुद्धां झाला नाहीं. पुढल्या ८ व्या प्रकरणांत हीच कथा – ब्रिटिश कारभाराची – स. १८५७ पर्यंत नेली आहे. पण तिजसाठीं युरोपांतील आर्थिक-राजकीय चळवळींचे हिंदुस्थानवर झालेले परिणाम नोंदले आहेत. ब्रिटिश राज्यकारभार होता तरी कसा, याची फोड केल्यावर राज्यकर्त्यांच्या मनोभूमिकेंतला फरक दाखविला. कायमची धारावंदी व रयतवारी सारा-



अनुक्रमणिका






वसुली यांचा उल्लेख याच ओघांत येतो. लष्करी व्यवस्था, मुलकी कारभार, न्यायपद्धत ...... यांचा तपशील सांगितल्यावर ब्रिटिश व्यवस्थेचे परिणाम तपासले. पण त्यांची सविस्तर चर्चा पुढील ( ९ व्या ) प्रकरणांत केली.

राजा तोडरमलपासून धारापद्धत होती तिची छाननी केल्यावर आमच्या शेतीवर ब्रिटिशसत्तेचे दुष्परिणाम कोणते व कसकसे झाले ते मुद्देसूद मांडले आहेत. सावकारीची वाढ, मध्यम वर्गाचा उदय, ग्रामसंस्थांची विघटना, जुन्या पद्धतीची शेती, इत्यादि विषय निवडले; आणि प्रकरण संपलें ( पृ. ३५८ ) तरी विषय पुढील ( १० व्या ) प्रकरणांत चालू ठेवला. उद्योगधंदा कसा बसला याची तपासणी ह्या प्रकरणांत चालू आहे. अठरावें शतक संपण्यापूर्वीपासूनचे निर्यातीचे आंकडे, त्यावर परदेशीयांची आयात जकात, यांची फोड केल्यानंतर ब्रिटिश सत्तेनें येथील धंदे कसे मारले तें स्पष्ट करून दाखविलें. परदेशी व्यापारांत– आयात –निर्यातीत– फरक कसा पडला, हें तक्त्यानिशीं सिद्ध केलें. याचा प्रत्यक्ष परिणाम म्हणून भारतीय संपत्तीचा ओघ ब्रिटनच्या रोखानें कसाचालू झाला हें दाखवितांना हिंदुस्थानच्या पैशावर इंग्लंड कसें गबर होत गेलें हें पटवून दिलें आहे. येथें ( पृ. ३९२ ) दश प्रकरणात्मक प्रथम खंड संपला. पुढील आठ पानांत सूची आहे. मिळून चारशें पानें पुरीं झालीं ! !

आतां तज्ज्ञांनीं, सूज्ञांनीं, जाणत्यांनी, इतिहासभक्तानीं; मजसारख्या सामान्य वाचकांनीं – कुणींहि सांगावें कीं, एवढ्या अवकाशांत भारतीय स्वातंत्र्य चळवळीचा इतिहास, बीजरूपानें तरी कोठें आढळतो का ? भारत-सरकारच्या " सत्यमेव जयते " ह्या ब्रीदवाक्यानिशीं प्रसिद्ध झालेल्या ह्या ४०० पृष्ठाच्या ग्रंथास आमच्या स्वातंत्र्य चळवळीचा इतिहास प्रथम खंड ( तीन खंडापैकीं एक ) कसें म्हणावें ? पुस्तक वाचीत असतां निदान " छप्पन्न " वेळां तरी नांव काय आहे याचें ? ही शंका उत्पन्न होई. मलपृष्ठावर स्पष्टपणें भारतीय स्वातंत्र्य चळवळीचा इतिहास लिहिलें–छापलें आहे. एवढेंच काय पण डाव्याबाजूस समपानांवर तेंच नांव छापलें असल्यानें एक शंका निवृत्ति झाली कीं भलत्याच कुठल्या तरी पुस्तकाला हें मलपृष्ठ चुकून लागलें नाहीं. भारत सरकारचें प्रकाशन खातें– अनेक पुस्तकांचा अवाढव्य कारखाना– चुकून व्हायचें एकादेवेळीं. पण नाहीं. हीं पुस्तकें बांधतांना चूक झाली नसून ती असलीच तर लेखकाच्या ( = प्रो. ताराचंदांच्या ) किंवा वाचकांच्या मनांतली असावी. स्वातंत्र्य चळवळीचा आरंभ ब्रिटिशांच्या अमदानींत झाला म्हणून ब्रिटिशांचा समग्र इतिहास धुंडाळण्याचें किंवा ते येथें आलेच कां ? कसे ? याचा मागोवा घेत घेत पांचसहाशें वर्षें मागें जाण्याचें प्रयोजन सामान्य वाचकांच्या लक्षांत येत नाहीं. स्वातंत्र्याच्या चळवळीचा हा इतिहास आहे म्हणून जगतितलावर तें स्वातंत्र्य केव्हां अवतरलें, कसें ? कोणत्या स्वरूपांत ? इत्यादि तपशीलवार प्रत्येक स्वतंत्र देशाचा इतिहास ऐकावयाची शिक्षा लाभली नाहीं हें भाग्यच म्हणावें, दुसरें काय ?

चळवळीचा इतिहास कोठून सुरू व्हावा, ही आपण विवाद्य गोष्ट मानूं. आतां प्रथम खंड लिहून छापून तयार झालाच आहे, तेव्हां तो आहे त्या स्वरूपांत त्याचें परीक्षण करूं या. गोष्टीवेल्हाळ म्हणून धुंडीराज ( गडकरीकृत भावबंधनमधील ) आपणांस आवडतोच कीं नाहीं ? त्याचेंहि आपण कौतुक करतों. त्याच्या विषयांतराला आपण नांवें ठेवीत नाहीं. मूळ मुद्दा अजीबाद विसरून गेल्याबद्दल आपण त्यांजवर रागावतों थोडेंच ? तसेंच या ग्रंथाच्या विस्तारापुरतें समजूं. पण एकंदर ग्रंथच धुंडिराजी धोरणाचा आहे म्हणून त्याकडे दुर्लक्ष करणें गैर ठरेल. इतिहास कथन, कथनकाला दिलेलें वळण, सांगणाराची शैली, त्याची मखलाशी याबद्दल लिहिणें अत्यावश्यक आहे. विशेषतः भारत सरकारी छापाचें पुस्तक म्हणून त्याचा फैलाव जगभर होईल आणि भलतेंच मत–भलताच विचार– सरकारी छापामुळें राजमान्यतेमुळें–इतरत्र रूढ होईल.

वादग्रस्त बाबीपैकीं मुख्य म्हणजे आम्हां मराठ्यांच्या इतिहासाबद्दलची. आमची राज्यव्यवस्था कशी होती–आम्ही उत्तरेकडील कारभारांत "हात" कां घातला आणि पानिपतच्या संग्रामांत आमचें धोरण काय होतें, याबाबींचा विचार प्रो. ताराचंदांनीं योग्य रीतीनें केला नाहीं, ही मुख्य तक्रार आहे. शिवछत्रपतीनीं " हिंदवी " स्वराज्याचा उच्चार केला होता, त्याचा विपर्यास " हिंदुपदपातशाही " असा करून










अनुक्रमणिका

प्रो. ताराचंद काय साधूं पहातात ? हिंदुस्थानांत रहाणारे ते हिंदवी, हिंदुस्थानांतली भाषा ती हिंदवी भाषा, असा वाक्प्रचार शिवकालीं रूढ असतां हिंदुपदपातशाही असें मुद्दाम खोटेंच कां म्हणावें ? शिवछत्रपतींनीं आपणांस राजे आणि छत्रपति असें म्हणविलें, "पातशाहा" असें म्हणवून घेतलें नाहीं. शिवाय हिंदूंचाच तेवढा ते पक्षपात करीत असते तर त्यांच्या पदरीं होते तेवढे इस्लामी सैनिक किंवा अधिकारी कसे राहिले असते ? तेव्हां हिंदुपदपातशाहीचा आरोप शिवछत्रपतींवर करणें अनुचित होय. त्याचप्रमाणें महाराष्ट्रीय ( = मराठा ) संतांना म्हणे हिंदु-मुस्लीमांची एकी घडवून आणावयाची होती. ते ( संत ) मूर्तिपूजेचे विरोधक होते; यात्रा करण्याच्या विरुद्ध त्यांची शिकवण होती......शिवाजी त्यांना गुरु मानी...म्हणून शिवछत्रपतींचें धोरण "जगा-जगूं द्या" या रीतीचें होतें ( पृ. १६० ) हा इतिहास स. १९६१ मध्यें भारत सरकारच्या शिक्यानिशीं प्रसिद्ध होत आहे—ही नामुष्की कोणाची ? वाचकांची, लेखकाची कां आश्रयदात्या सरकारची ? मला वाटतें, ही तिघांचीहि नामुष्की होय ! !

वारकरी पंथांत "वारी" चें महत्त्व किती आहे हें सुद्धां प्रयागनिवासी प्राध्यापकांना ठाऊक नाहींसें दिसतें. "कर कटेवरी– उभा विटेवरी" हें वर्णन निर्गुण निराकार प्रभूचें नव्हे. "सुंदर तें ध्यान–" "रूप पाहतां लोचनीं", "मुगुट कुंडलें वनमाला" असे शेकडो अभंग आहेत. त्यांवरून मूर्तिपूजेच्या-विरुद्ध अर्थ काढणाराचें शहाणपण विपरीत आहे. एवढेंच म्हणावयाचें. तुकाराममहाराजांना प्रार्थना-समाजांत मान आहे. एवढ्यावरून झाडून सर्व संत प्रार्थनासमाजाचे कट्टे अनुयायी होते, असें अनुमान करणाऱ्याच्या तर्काची नुसती तारीफ करावी. दुसरें काय ? कारण भागवत ( भक्ति ) संप्रदायांतल्या ह्या संतांनी विठोबाचा (आणि रामदासांनीं तेवढा रामाचा) महिमा वर्णिला आहे. "पंढरीची वारी" –दिंडी-पताका–घेऊन विठ्ठलाचा जयघोष करीत जावयाचें–हें त्यांचें वैशिष्ट्य, अशा संतांची शिकवणूक– ( १ ) मूर्तिपूजेच्या विरुद्ध ( २ ) यात्रा करण्याच्या विरुद्ध ( ३ ) हिंदु-मुस्लीम एकीसाठीं होती असा निष्कर्ष काढून तो त्या संतांच्या माथीं कां मारावा ? कुणातरी हस्तकावर प्रो. ताराचंद विसंबले आणि मग भलताच अर्थ काढून त्याचा शिवाजीशीं बादरायण संबंध जोडून दिला. इतिहास लेखनांत अशी ढिलाई–असा विपर्यास –कुचकामी होय. तो निंद्य प्रकार म्हटला पाहिजे.

परंतु विपर्यास ह्या पुस्तकांत अनेक ठिकाणीं आढळतो. इतिहासकाराचा प्रामाणिकपणा म्हणतात, तोसुद्धां ह्या सरकारी छापाच्या ग्रंथांत, प्रयाग विद्यापीठांतील कुलगुरुपदापर्यंत चढलेल्या ह्या इतिहास विषयाच्या प्राध्यापकांना पाळतां आला नाहीं, याचें आश्चर्य वाटतें. पृ. १६०-६१ वर मिळून संभाजी संबंधीं एकच वाक्य आहे – तें जदुनाथ **सरकारांचें** म्हणून उद्धृत केलें आहे.

( १ ) मूळ दोन वाक्यें असतां अर्धा-अर्धा भाग घेऊन मजकूर शब्द गाळून एक बनविलें, अवतरणांत घालून मुळांत आहे तसें छापल्याचा आव आणला—

( २ ) मूळ उतारा पॉंडिचरी संस्थापक मार्टिनचा असतां, हें वाक्य जदुनाथ सरकारचें आहे असें भासविलें. तळटीपेंत तसा उल्लेख केला नाहीं.

( ३ ) हाऊस ऑफ शिवाजी ( १९४० ) च्या आवृत्तींत तो पृ. २०३-०४ यांवर असतां पृ. १९७ असें छापलें. इतिहास लेखनाचा कोणता शिष्टसंमत संकेत या प्रकारांत पाळला आहे, हें ज्याचें त्यानें ठरवावें.

संभाजीच्या आचाराबद्दल साधी बाब होती – म्हणून वरील मार्टिनचें उदाहरण क्षम्य मानलें, त्याकडे काना-डोळा करायचें ठरविलें, तरी वली उल्लाच्या शिकवणी-बाबत काय समजावें ? आम्हांला वलीं उल्लाच्या कलम-बहाद्दरीची ओळख श्री. सेतु माधवराव पगडी यांच्या-मुळें झाली. वसन्त ( मे १९६० ) मध्यें त्यांनीं त्या इस्लामी पंडिताचीं कांहीं निवडक पत्रें मूळ फार्सीवरून मराठी अनुवादिलीं–तीं वसन्तमध्यें प्रसिद्ध झालीं. इस्लामी धर्मरक्षणासाठीं–आपल्या पठाणी बांधवांच्या संरक्षणासाठीं–मराठ्यांचा काटा काढण्यासाठीं– तुम्हीं यावें, असें अब्दालीला आवाहन देणारा इस्लामी पंडित, पांडित्याच्या दृष्टीनें कितीहि वरचढ असला तरी राष्ट्रीय दृष्ट्या त्याचें महत्त्व कां मानावें ? त्या वेळच्या परि-स्थित्यनुसार त्याचें आचरण होतें–तो औरंगजेबाप्रमाणें स्वतःच्या धर्माचा आग्रह धरणारा होता-असें सत्यकथन

करण्यांत कुठलाहि कमीपणा मानण्याचें कारण नाहीं. पण सत्याचा विपर्यास करण्यासाठींच जणो कांहीं स्वातंत्र्य चळवळीच्या निमित्तानें, मन मानेल तितका पुराणा–रुचेल त्या पद्धतीनें, इतिहास सांगावयाचा असें ठरविलेलें दिसतें. एरवीं त्यांच्या ह्या स्वैरविहाराचा अर्थ लावायचा कसा ?

वली उल्लाबद्दल त्यांनीं असें लिहिलें आहे:– हिंदु-मुस्लीमांची एकी घडवून, आपापला धर्म न सोडतां परस्परांची धर्मभावना न दुखवतां न्यायानें वागण्याची, धार्मिक विचारांना मान्यता देण्याची रीत जहांगिर आणि शहाजहान यांची होती– तिचाच पुरस्कार शहा वली उल्लानें केला ( पृ. २०० ). वली उल्लाच्या कृतींतली विसंगति–अबदालीला इस्लाम संरक्षणार्थ पाचारण–दिसून आल्यानें पृ. २०८ वर त्याच्या विरुद्ध थोडेसें मत व्यक्त केलें आहे. पण आधीं बराच वेळ त्याचा निष्कारण बडेजाव माजवून त्याचा गौरव केला. आम्हांला त्याच्या पत्रांतील आशय मराठी रूपांत वाचावयास मिळाला, त्यावरून पहातां प्रा. ताराचंदांनीं वलीउल्लाचे गोडवे अधिक गाइले आहेत–त्याचें पाणी त्यांनीं नीट जोखलें नाहीं किंवा त्यांनीं जाणून बुजून त्याला सांवरून घेतलें–असें म्हणणें भाग पडतें. तरी प्रा. ताराचंद लिहितात : " सर्वांचा धर्म एकच आहे : फरक आहे तो नियम व बंधनें याबाबत " अशी त्याची शिकवण होती ( पृ. १४८ ). परंतु हें एवढें एकच वाक्य त्यांनीं उद्धृत केलें आहे तें विविध धर्मांसंबंधीं नसून **इस्लामी धर्मांतील निरनिराळ्या पंथांबद्दल आहे !!** असा विपर्यास प्रचारकानें केला तर तो क्षम्य मानतां येईल. पण सरकारी छापाचा इतिहास लिहितांना अशा विपर्यासाची काय जरूरी ?

मराठयांचें लष्कराकडे दुर्लक्ष होतें असें सिद्ध करण्यासाठीं नाना फडणिसाचें उदाहरण मुद्दाम विपरीतपणें दिलें आहे. नानांचें खास शरीरसंरक्षक म्हणून अरबांचें एक पथक खासगी होतें. नानांच्या मृत्यूनंतर त्या अरबांनीं अंत्यसंस्कारापूर्वी आपला पगार चुकता करावा अशी मागणी केली. ह्याचा उल्लेख करून आमचे प्रयागनिवासी प्राध्यापक म्हणतात : नानानें ' स्वतःची गंगाजळी बरीच जमविली होती; पण तो मोठा चिक्कू होता–इतका कीं तो साऱ्या लष्कराची उपासमार करीत असे " ( पृ. १६३ ). नानांचा शरीरसंरक्षकांची टोळी–किंवा तिचें पगाराबद्दल अडवणुकी मागणें, यांचा विपर्यास ह्यापेक्षां अधिक " चांगला " कुणाला करतां येईलसें वाटत नाहीं. दक्षिणी मराठयांबद्दल जाणून बुजून अशा तऱ्हेचा विपर्यास करून हे औत्तरीय प्राध्यापक " राष्ट्रीय भावनात्मक एकीकरण " साधूं पहात आहेत ?

दिल्ली म्हणजे हिंदुस्थानी वैभवाचें केंद्र –अशा भावनेनें त्या राजनगरीला मान अनेक शतकें मिळत गेला आहे. कलकत्त्याची राजधानी बदलून ब्रिटिशांनीं ती दिल्लीस नेली ( स. १९११ ) तिच्यामागें हा हेतु होता. वेळोवेळीं " दिल्ली दरबार " भरले– कलकत्ता दरबार नव्हे– याचेंहि कारण हेंच. प्रो० ताराचंद यांचा औत्तरीयांबद्दल आपलेपणा आहे. पण मराठे हे ( दाक्षिणात्य असल्यानें ? ) त्यांना परके वाटतात असा त्यांचा सूर सर्व पुस्तकांत लागलेला दिसतो. हिंदुस्थानच्या इतिहासांत मराठ्यांना स्थान नाहीं– असाच जणु त्यांचा समज असावा. दिल्लींत बादशहानें सार्वजनिक नाचणारीशीं लग्न लावलें... सर्व कारभार तिच्या हातीं गेला... ( पृ. ५४-५५ ). तरी त्यांत बादशहाची बेअब्रु होत नाहीं असें प्रो० ताराचंदांना वाटलें. नादिरनें येऊन नाहीं नाहीं ते अत्याचार केले– त्यांत कांहीं फारसें बिघडलें नाहीं... पुढें अबदालीनें तर नादिरच्या सवाई अत्याचार केले– नुसत्या दिल्लीवर नव्हे– तर मथुरावृंदावनावर सुद्धां. याबद्दलहि आमच्या स्वातंत्र्य चळवळीच्या इतिहासकारांना फारसें वाईट वाटलें नाहीं. पण मराठे ? त्यांनीं " बादशाही " आपल्या ताब्यांत घ्यावी ? त्यांनीं दिल्लीच्या राजकारणांत ढवळाढवळ करावी ? म्हणजे केवढा उपमर्द ! जसा कांहीं अस्पृश्यांनीं केलेला ( जुन्या पुराण्या जमान्यांत )मंदिरप्रवेश ! मराठे तरी किती धीट पहा - नुसता मंदिर प्रवेश करून ते थांबले नाहींत —तर त्या मूर्तीची पूजाअर्चा देखील त्यांनीं आपल्या हातीं घेतली !! अशी वृत्ती इतिहासकाराची - भारतीय इतिहासकारची असावी काय, हें जाणत्यांनीं सांगावें.

म्हणून मराठ्यांचें नांव निघतांच जशी कांहीं या औत्तरीय प्रोफेसरांच्या कपाळास आठी पडते. त्यांनीं









म्हणे अब्दालीशीं निष्कारण झगडा केला. कंदाहार पासून येऊन तो दिल्लीस थडके– हें रास्त होतें– स्वाभाविक होतें– त्यांत गैर कांहींच नाहीं... फक्त त्यानें बादशहाची अशी मानहानि करायची नव्हती ... अशी वृत्ती एकीकडे, आणि दख्खनी मराठ्यांना मात्र नर्मदेपल्याड आपल्या पराक्रमाला वाव मिळूं नये अशी प्रो. ताराचंदांची पक्की समजूत असल्याप्रमाणें त्यांनीं जेथें तेथें मराठ्यांचा उल्लेख केला आहे. हें वैषम्यसूत्र ह्या इतिहासांत सर्वत्र वावरतें आहे. दाक्षिणात्य-औत्तरीय हा इतिहास लेखकाच्या मनांतला झगडा मराठ्यांच्या निमित्तानें कसा प्रकट झाला आहे पहा —

पृ. ५७ वर रघुनाथरावाच्या स. १७५३-५५ च्या स्वारीचा फलितार्थ दिला आहे. " उत्तरेकडील सर्व लोकांमध्यें मराठ्यांबद्दल ( विरुद्ध ) भीति, क्रोध, आणि द्वेष वाढत राहिला– या रघुनाथरावाच्या कर्तबगारीचे परिणाम विध्वंसक ठरले. " पृ. ५८ वर आढळणाऱ्या " शिव्यां " वरून मराठ्याबद्दलच्या अढीचें स्वरूप ( इतिहासकाराच्या मनांतलें– जनतेच्या नव्हे ) स्पष्ट होतें. त्यांचा अनुवाद केला तर प्रो० ताराचंदांविरुद्ध आमचे वाचक खवळतील आणि औत्तरीय–दाक्षिणात्य वाद वाढविल्याचा आरोप येईल. पण जाणत्यांनीं तो अभिप्राय अवश्य वाचावा.

पानिपत संग्रामाबद्दल अशा पूर्वग्रही इतिहासकाराकडून समतोल निरीक्षणाची अपेक्षा चूक होईल. हीं विधानें " विनाधार " असल्यानें ( त्यांचा आधार दिला नाहीं ) त्यांबद्दल पृच्छा करणें अप्रस्तुत नव्हे.

" मराठ्यांची सरशी झाली असती तर अयोध्येच्या नबाबाला त्यांची कायमची गुलामी पत्करावी लागली असती. ती भीति अबदालीबद्दल नव्हती कारण तो कांहीं " हिंदुस्थानांत " रहाणार नव्हता. मराठ्यांनीं त्याच्या वडिलाचा विश्वासघात केला होता– आणि त्यांच्या शब्दावर विसंबणें शक्य नव्हतें. " ( पृ. ६० )

ह्यांतील विधानांना आधार तर नाहींच; पण तर्क किती दुष्ट आहे, तो स्पष्ट करण्याची जरूरी नाहीं. मराठ्यांच्या विरुद्ध लेखकाच्या मनांतले विचार...... ह्या अशा विरोधकांच्या तोंडीं घालण्याचें कौशल्य वाखाणण्यासारखें मुळींच नव्हे. ही छुपी वार करण्याची पद्धत आहे.

" मराठ्यांना एकही दोस्त उत्तरेंत नव्हता हें उघड आहे. " ( पृ. ६० ; ) आसपासचा सर्व प्रदेश मराठ्यांचा विरोधी बनल्यानें, मराठ्यांवर सूड उगविण्यासाठीं जळफळत असल्यानें–मराठ्यांना कुठलीच रसद मिळाली नाहीं......भाऊच्या आडमुठेपणामुळें अबदालीनें आपला मुक्काम वाढविला ... आणि एकदांचा सोक्षमोक्ष करायचा असें ठरविलें. ( पृ. ६१ ) पानिपतावर मराठ्यांची सरशी झाली असती तरी भारतीय इतिहासाचा ओघ कांहीं वेगळ्या रीतीनें वहावला नसता. मराठ्यांना स्वतःच्या मुलुखांतहि राज्यकारभार नीटसा साधला नाहीं...पेशव्यांच्या राजवटींत तर लूट आणि खंडणी यांवरच फौजांचे खर्च भागविण्याची रीत होती ... ( पृ. ६२ )...इतर सरदारांना वाटे पेशवे " कानामागून आले "... म्हणून ते पेशव्यांचा मत्सर करीत ... मराठ्यांनीं आपल्या प्रजेचे हितसंबंध पहाण्याकडे किंवा सांस्कृतिक वाढीकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. " ( पृ. ६३ ) आपल्या सामर्थ्याचा, आपल्या जवळील आर्थिक साधनांचा कांहींहि विचार न करतां मराठ्यांनीं दिल्लीच्या राजकारणांत उडी घेतली... त्यांना फक्त त्या स्थळाचा मोहकपणा फूस लावीत होता...... ( पृ. ६५ )... शिवाजीचें हिंदुपदपादशाहीचें स्वप्न अशा प्रकारें ' गडप ' झालें!! ( पृ.६९ )

हीं निवडक वाक्यें मराठा-विद्वेषाचीं निदर्शक आहेत. दोनशें वर्षांनंतर पानिपतबद्दल लिहितांना हीच वृत्ती, हाच दृष्टिकोन आमच्या इतिहासकारांचा असेल, तर ह्यापेक्षां "साहेब" इतिहासकार पुरवला, असें म्हणावें लागेल. कारण इतिहास लिहितांना निःपक्षपातीपणाची आवश्यकता भासते, तशी **समजूतदारपणाची, आपुलकीचीहि** जाणीव आवश्यक असते. एरवीं कुणाहि इतिहासकारानें कुठल्याहि लोकांचा, राष्ट्राचा इतिहास लिहिला तर तो ' सर्वमान्य ' झाला पाहिजे. तो तसा होत नाहीं कारण परकीय इतिहासकारांत आपुलकीचा आणि सहानुभूतीचा ओलावा " कमी " वाटतो. आमच्या हिंदुस्थानचे इतिहास निरनिराळ्या साहेबांनीं कमी का लिहिले आहेत ? आणि १८५७ बद्दलच्या ग्रंथांची यादी किती तरी मोठी होईल. तरी







डॉ. सुरेंद्रनाथ सेन कडून नवें पुस्तक " १८५७" चें भारत सरकारनें लाखों रु. खर्चून लिहवून घेतलें ना ? भारतीय विद्याभवन, इतिहास परिषद यांसारख्यांचे प्रयत्न भारतीय इतिहास नव्यानें लिहिण्याचे चालू आहेत. शिवप्रभूंचें चरित्र मुद्दाम वेगळें लिहवून घेण्याचे दोन निरनिराळे प्रयत्न महाराष्ट्रांत कां होत आहेत ? इतिहासकाराला वर्ण्य-विषयाबद्दल आपुलीक किती वाटते – किंवा त्याची सहानुभूति कुणाबद्दल किती प्रमाणांत आहे—ह्याच कसोटीवर इतिहासलेखकाची पात्रापात्रता ठरते. इतर गुण त्यांच्यांत असलेच पाहिजेत. पण तो कांहीं लोभास्तव ( किंवा निर्हेतुकपणें कां होईना ) कोणा लोकांच्या आकांक्षाचा विपर्यास करण्यास, त्यांची बदनामी करण्यास तयार झाला, तर त्याची पायरी खालची ठरते. ब्रिटिशांनीं वेळोवेळीं इतिहास लिहवून घेतले; भारताविरुद्ध प्रचार करण्यास परदेशी लेखकांना आश्रय दिला—त्या दर्जाच्या लेखकांत आमच्या राज्यसभेचे ज्येष्ठ सभासद प्रो. ताराचंद यांना बसविण्याची आमची इच्छा नाहीं. पण त्यांच्या ह्या इतिहासावरून त्यांच्या **"गुणगणां"कडे सकल दोष याचा असे** असा निष्कर्ष निघतो. मराठे हेहि भारतीय आहेत-भारतीयांचे गुण-दोष हे मराठ्यांतहि आहेत—आणि भारतीय इतिहासांतील मराठ्यांचें पर्व गाळतां येणार नाहीं—तें अत्यंत निंद्य मानण्याचें मुळींच कारण नाहीं. भारतीयांना आजहि अभिमान वाटावा असे पराक्रम मराठ्यांनीं गाजविले आहेत. त्यांची उपेक्षा करणें कोणाहि इतिहासकाराला शोभणार नाहीं-त्यांच्या कामगिरीचें अवमूलन केल्यास स्वतः इतिहासकार अवमानित ठरेल, एवढें आमच्या प्रयागच्या इतिहासकार प्राध्यापकांनीं व त्यांच्या मदतनिसांनीं ओळखावें म्हणजे झालें. असो.

मराठ्यांच्या मुलुखगिरीबद्दल त्यांची निंदा या पुस्तकांत " ऐतिहासिक निवेदना "च्या भरांत केली आहे. जदुनाथ सरकारांचाहि आधार त्या निंदेसाठीं घेतला आहे. नादिरशहा, अबदाली अशांनीं खणत्या लावून दिल्लीची लूट केली ती जणू कांहीं रास्त; पण मराठ्यांची मुलुखगिरी तेवढी गैर असा पक्का समज झाल्याप्रमाणें हें निवेदन रंजित आहे. मुलुखगिरी म्हणून मराठ्यांनीं देशांत लूट माजविली—हें एकवेळ बाजूस ठेवूं. पण मोगल सरदार निरनिराळ्या प्रदेशांत जात तेव्हां काय करीत होते ? प्रजाजनांना वाटण्यासाठीं खिरापतीचीं पोतीं ते नेत होते कीं काय ? पद्धतशीर करपट्टीची आकारणी होत नसते तिथे परप्रांतीयांनीं वसूल कसा करावा ? ज्या प्रदेशावर मराठ्यांची सत्ता झाली—ते प्रदेशहि मराठे पुनः पुनः मुलुखगिरीसाठीं लुटूं लागले असें कुठें झालें नाहीं. मोगल सरदारांनीं वाटेल त्या ठिकाणची लूट न्यावी- त्यांना ती मोकळीक. फक्त मराठ्यांनींच लूट करूं नये, अशी आमच्या इतिहासकारांची अपेक्षा. चौथ—सरदेशमुखी ही ' पर-राज्या'कडून घ्यावयाची अशा रीतीनें मराठे वागले यांत चुकलें कुठें ? ज्या प्रदेशावर चौथ वसूल करण्याचा त्यांना हक्क नव्हता, तेथें जाऊन वसुलीसाठीं जुलुम जबरदस्ती मराठ्यांनीं केली नाहीं. परंतु दक्षिणच्या सुभेदाराला ( मराठ्यांकडे दक्षिणची चौथ सरदेशमुखी असतांहि ) **' दक्षिणचा राजा '** ( पृ. १६२ ) असे आमचे मान्यवर इतिहासकार लिहितात, त्यांना काय म्हणावें ?

शिव छत्रपतींच्या वेळची मुलुखगिरी थोडी तरी रास्त होती. पण पेशव्यांच्या वेळची मुलुखगिरी म्हणजे " नग्न आक्रमण " ( पृ. १६५ ) असें त्यांचें प्रामाणिक मत आहे. नादिर कुली किंवा दुराणी अबदाली यांच्या हल्ल्याला ते चढाई किंवा आक्रमणहि म्हणायला, त्यांना त्याबद्दल काडीमात्र दोष द्यायला ते तयार नाहींत. हें विशेष. मराठ्यांनीं स्वधर्मीय हिंदू- जाट - राजपूत अशांनाहि लुटावयास कमी केलें नाहीं; त्यांच्या क्रौर्याचे नमुने- बंगाल्यांत आणि दुआबांत पसरले - असें प्रो० ताराचंदांचें म्हणणें. त्यांना या वेळींच धर्म कां आठवला हें कळत नाहीं. मोगल बादशहांनीं दक्षिणेतल्या पांच शाह्या बुडविल्या. त्या तर परधर्मी नव्हत्या ? दिल्लींत बाहुलें कोण उभें करावें ( = तख्तावर बसवावें ) याबद्दल माजलेलीं भांडणें-झालेले अमानुष अत्याचार हे तर समधर्मीयांत होते ना ? प्रो० ताराचंदाच्या ह्या धार्मिक निर्देशावरून वाटतें कीं दिल्लीच्या राजकारणांत " हिंदु मराठ्यांचा " शिरकाव झाला - तेथें त्यांचें प्राबल्य ठरलें, हीच गोष्ट त्यांना झोंबते कीं काय ? मुसलमान कधीं अधर्मानें वागणारच नाहींत - असा त्यांचा दुसरा समज दिसतो. कारण








त्यांनीं मराठ्यांचे दाखविले तसे किंवा तितके दोष दुसऱ्या कुणाचेहि दाखविले नाहींत. उलट मिटक्या मारीत, जिभल्या चाटीत मोंगली "पराक्रमा"चीं वर्णनें करावीं आणि मराठ्यांना शेलक्या शिव्या मोजाव्या अशी त्यांची रीत दिसते.

अखिल भारतीय दृष्टीनें इतिहास लिहावयाचा तर त्यांत एका विवक्षित गटाबद्दल (विरुद्ध) पूर्वग्रह असूं नये; दुसऱ्या कुणाबद्दल खास मेहरनजरहि दिसूं नये, याबद्दल दक्ष रहाणें आवश्यक असतें. हें तत्त्व प्रस्तुत परीक्ष्य ग्रंथकारांना मुळींच कळलें नसावें; अगर कळलें असल्यास तें वळलें नाहीं हें खास!

जातवारीची महति छुप्या रीतीनें व्यक्त झाली असल्यानें तिची थोडी तपशीलवार माहिती दिली पाहिजे. स्वातंत्र्य चळवळीच्या ह्या इतिहासांत "कायस्थां"चा बडेजाव किती आपुलकीनें वर्णिला आहे. तो मुद्दाम पहाण्यासारखा आहे. "मोगल बादशाहीत वसूल खातें आणि फडणिशी **कायस्थांनीं** सांभाळली" ह्या निर्देशाची (पृ. १४४) आवश्यकता पटवून देतां येणार नाहीं. त्याचप्रमाणें पृ. २१२–१३ वर सवाशें वर्षांपूर्वीच्या शिक्षणाची माहिती सांगतांना विद्यार्थ्यांची, शिक्षकांची, जातवारीच्या निमित्तानें **कायस्थ** आणि ब्राह्मण, **कायस्थ** आणि ब्राह्मणेतर, **कायस्थ** आणि मुसलमान... असा कायस्थांचा अग्रिम उल्लेख "प्रयोजनमनुदिश्य" आहे असें म्हणतां येत नाहीं. खिश्चन, मुसलमान, पारशी, यहुदी, फार काय **हिंदु** अशा लोकांचा उल्लेख सूचींत मुळींच आढळत नाहीं. पण **कायस्थांचा** हटकून आढळतो. त्याचप्रमाणें सूचींत धर्मवारी सांगण्याचें सांगण्याचें कारण नसतां, "**इस्लामी** तत्त्वज्ञ" "**इस्लामी**" पंडित, मुस्लीम धर्मगुरु; अशा प्रकारचे **सात**[1] उल्लेख आढळतात. पण नानक हा नुसता "गुरु" आहे. असा पक्षपात आणखीहि पुष्कळ आहे. जात्यभिमान, धर्माभिमान, निदान त्याबद्दल जाणीव ह्या स्वातंत्र्य चळवळीच्या इतिहासकारांना किती आहे याची कल्पना अशा उल्लेखांवरून सहज येते. आमची तर सूचना आहे कीं ह्या निर्देशामुळें जातीय अभिमान वाढतो कीं एकराष्ट्रीयत्वाची भावना बळावते, याची छाननी करण्यासाठीं पार्लमेंटनें एक समिति नेमावी. मात्र तींत एकहि **कायस्थ** असूं नये–एकहि मुस्लीम नसावा. असो.

> ## "स. १८५७" चा मेहनताना
>
> रु. २५,००० ग्रंथकारांस रोख<br>(पांच हप्त्यांनीं मिळून)<br>रु. ७२०० : तीन मदतनीस<br>एका वर्षासाठीं प्र. २०० रु. म.<br>विलायतचा हवाई प्रवास<br>तेथील वास्तव्य<br>या खेरीज छपाई :<br>हिंदी व इतर अनुवाद<br>डॉ. सुरेंद्र नाथ सेन यॅांस.

ब्राह्मणांची कुचेष्टा करण्याच्या मिषानें म्हटलें आहे : धर्माचे अधिकारी ब्राह्मण होते; समाजव्यवस्था टिकविण्याचें काम त्यांचें नव्हतें. त्यांच्या कामांपैकीं एक असें होतें कीं मराठा सरदारांना किंवा इतरांना राजपूत वंशाशीं जुना संबंध दाखविण्यासाटीं वंशावळी "**बनविणें**" (पृ. १४४–४५)

आणि चिश्ती सिलसिल्या (परंपरे) ची विशिष्ट पद्धत, प्रोफेसर हबीब यांचा हवाला देऊन सांगितली आहे ती अशी : "मुस्लीमेतरांना बाटविणें ही त्यांची कामगिरी नव्हती" (पृ.१४८). आहे कां खरें हें?

अशा अगणित गमती ह्या प्रथम खंडांत आढळतात. बिनचुकपणा आमच्या सरकारी प्रकाशनांत दिवसानुदिवस अधिकाअधिक दुर्मीळ व्हावा, ही लेखकांची –मुद्रकांची अवनति होय!! प्राध्यापकांनीं संशोधक साहाय्यकांकरवी लिहिलेल्या ऐतिहासिक ग्रंथांत इतक्या चुका रहातात ही अत्यंत शरमेची गोष्ट होय.

ह्या एकंदर इतिहासांत निष्काळजीपणाचें साम्राज्य आढळतें. पृष्ठक्रमानुसार त्यांची नोंद केलेली बरी. पृ. ४७ वर मुहंमद अमीनखान आणि निझाम

१. फैझी, इब्न अरबी; इब्न-इ-तैमिया, मियॉं मीर, शहा अब्दुल अझीझ, शेख अहमद सरहिंदी, शहा वली उल्ला,... या नांवापुढें तीं ३ मुस्लीम आहेत, हें मुद्दाम सांगण्याची गरज होती कां?








उल्-मुल्क यांचें नातें चुलत्या - पुतण्याचें असतां तें " चुलतभावा " चें म्हटलें आहे. अब्दालीला आपली मुलगी देणें मुहमदशहाला भाग पडलें ( पृ.५८ ) असें सांगतांना तो मुहमदशहा अनेक वर्षें आधींच मृत्यु पावला होता. ( पृ. ५४ ) हें लिहिलें. त्याचा विसर पडला असें समजावें कीं अब्दालीशीं खास सोयरिक जमविण्यासाठीं तो कबरींतून उठून आला असें मानावें ? अब्दालीला ह्या मुलीच्या मानानें " आजोबा " म्हटल्याबद्दल सर जदुनाथांची चूक दुरुस्त करणारांनीं तरी आपल्या विधानाबद्दल जागरूक रहावयास हवें होतें ( पृ. ५९ तळटीप ). अब्दालीचा जन्म स. १७२४ चा असल्यानें ( रियासतकारांच्या मतें ) तो १७५७ मध्यें ३५ वर्षांचा असणार नाहीं-३३ वर्षांचा असेल.[२] कच्छ हें समुद्रवलयांकित बेट आहे ( पृ. ७५ ) हा शोध लावणारास आणि खानदेशपासून गोव्यापर्यंत कोंकणचा विस्तार ( पृ. ७५ ) सांगणारास भूगोल परिषदेनें बहुमान द्यावा-अशी शिफारस करूं या. औरंगजेबाच्या वेळीं " दिल्ली, आग्रा, अलाहाबाद, अयोध्या या प्रदेशांत हिंदी भाषा रूढ होती; बिहारांत बिहारी; माळव्यांत माळवी ... अशा भाषा रूढ होत्या. ( पृ. ८३ )

राजपुतांची प्रत्यक्ष संख्या किती हें सांगतांना त्यांची टक्केवारी सांगितली आहे ( स. १९०१ – पृ. ८४-'५ पुनः त्यांचे आकडे दशांश चिन्हें वापरून ' दशलक्ष ' प्रमाणांत पुढल्या छेदकांत दिले आहेत !! दोन्ही छेदकांची, राज्यवारी वाटणीची गरज काय तें विचारूं नका !! " हिंदुस्थानी पद्धत सर्वत्र रूढ झाली " असें बाबरच्या मुखानें भारतीय जीवनाबद्दल म्हटलें असतांही ( पृ. ८७ ) " अखिल भारतीय सांस्कृतिक एकी ... साधतां आली नाहीं " ( पृ. ७९ ) हा शेरा आधींपासून मारला आहे. हूणांचें साम्राज्य हिंदुस्थानांत स्थापन झाल्याचा उल्लेख ( पृ. ८४ ) एकीकडे असतां लगेच ( पृ. ८६ ) म्हटलें आहे कीं त्यां (हूणां)चें आसन फार डळमळीत होतें ! जातीय विचारांतला गोंधळ ( पृ. ९३ - १०० ) पुष्कळ पसरला आहे. तो मुद्दाम वाचावा. पृ. १२७ वरील पहिल्या छेदकांत मांडलेल्या विचारांतील धादांत खोटेपणा सिद्ध करण्याची जरूरी नाहीं. तो सरकारी इतिहास पुस्तकांत यावा, हें मात्र पुष्कळांना पटणार नाहीं. परंतु भारतीय राज्यपद्धतींचा अभ्यास करतांना पहिल्या प्रथम ' इस्लामी ' राज्याचा विचार व्हावा, कौटिल्य आठवूं देखील नये, त्याचें नांवहि ( पाणिनीचें आलें असतां ) या इतिहासांत येऊं नये हा परिणाम विस्मरणाचा, दुर्लक्षाचा कीं इस्लामानुनयाचा समजावा ? अज्ञानाचाहि हा परिणाम असावा असें एकंदर " तयारी " वरून वाटतें.

" मित्र मिश्र " हें कोण्या पंडिताचें नांव आहे ( पृ. १३२ ) कळत नाहीं.

न्याय निवाड्याची माहिती देतांना पुनः इस्लामी पद्धतीचें तेवढें वर्णन आहे. हिंदुधर्मशास्त्राबद्दल चकार शब्द नाहीं. ( पृ. १३८–४३ ). धिम्मी आणि झिम्मी ( पृ. १३६ व पृ. १३८ ) हा काय प्रकार आहे ? जिजि(झि)या कर आपणांस ठाऊक आहे, पण जाझता ( पृ. ३९३ ) हा कोणता नवा कर ?

भारतीय भूगोलांत भर घालण्याचें, किंबहुना हिंदुस्थानांत ( घटनेंत बदल केल्याशिवाय ) एक नवा जिल्हा " उत्पन्न " केल्याचें श्रेय प्रो. ताराचंदाना दिलें पाहिजे. मात्र हा जिल्हा कुठें आहे, तो त्यांना कुठें सापडला इत्यादि माहिती राज्य-सभेंतील सभासदांनीं त्यांना मुद्दाम विचारावी. ह्या प्रा. ताराचंद निर्मित नव्या जिल्ह्याचें नांव आहे जायदाद[३] ( पृ. १६४ ) ह्याचें उत्पन्न सालीना २७ लाख रु. असें तें सांगतात.

भूगोलांतच त्यांची भर नाहीं. दक्षिणेकडे त्यांनीं एका नवीन " चेट्टी " घराण्याची निर्मिती केली आहे. त्या घराण्याचें नांव " नथू कोठारी चेट्टी. " ( पृ. १८४ ) त्याची श्रेष्ठ कामगिरी अशी कीं बंगाल्यांत जसा जगत् शेट मोठा पेढीवाला होता – तसा म्हणे हा 'नथू कोठारी चेट्टी' दक्षिणेकडील फार मोठा पेढीवाला होता. हा सर्वांत श्रीमंतहि होता आणि सर्व उदीमधंदा म्हणे यानें बळकावला होता !! प्रो. ताराचंदांना या चेट्टी

२. नाकावरील त्याचा व्रण स. १७६२ पासून दिसूं लागला. पण तो आधीं चार वर्षांपासून होता असें सरकार आधारें सुचविलें आहे.

३. जायदाद –ह्या फार्सी शब्दांवरून हें नांव संभवतें. ( अर्थ " उत्पन्न " )





अनुक्रमणिका

घराण्याचें निर्मिति–श्रेय देण्यांत अडथळा आणणारे महाभाग म्हणतात कीं हा अज्ञानजन्य विनोद आहे. "नट्टु कोट्टाई चेट्टी" ही चेट्टी जनांची "जात" आहे. तिचा विपर्यास "नथू कोठारी चेट्टी" अशा मिश्र नांवानें झाला. ही धनिकांची जात, ह्या नव्या इतिहासामुळें भडकली असून आपल्या ज्ञातीची ही बदनामी केली; आपणांस भलतेंच नांव दिलें, म्हणून ज्ञातिसंघानें इतिहासकारांवर कायदेशीर इलाज करण्याचें ठरविलें आहे असें म्हणतात !!

प्रो. ताराचंदकृत घोडचुकांचा हा कोष वाढवावा तितका वाढवितां येईल. पण सबंध पुस्तकांतील दुरुस्त करतां येण्यासारखे दोष दाखवून आतां काय फायदा ? पाणिनीनें "कौमुदी" आणि "अमरकोष" लिहिला (पृ. २१४) रघुनंदन, जीमूतवाहन, मनु या ग्रंथ-(स्मृति) कारांच्या जोडीस मिताक्षरा (ही टीका) बसविली आहे (पृ. २१४). वाल्मीकि रामायण आणि अध्यात्म रामायण यांतील फरक ह्या इतिहासकारांना "कळत" नाहीं. (पृ. २२३) कारण त्यांनीं मल्याळी रामायणाचा उल्लेख केला आहे. तो अध्यात्म रामायणाचा आहे. "भगवद्गीता" लिहितांना चुका ह्या सरकारी पुस्तकांत असाव्या ही भारतीय मुद्रकांची नाचक्की होय !!

आमच्या इतिहासाचा किंवा इतिहासकारांचा दर्जा इतका खालावलेला आहे. याची जगभर प्रसिद्धी करण्यासाठीं हा ग्रंथ भारत सरकारच्या शिक्क्यामोर्तबानिशीं प्रसिद्ध केला कीं काय ? दुसराहि एक विचार ज्ञाति प्राधान्य देऊन, हिंदुधर्मशास्त्र, हिंदुराज्यशास्त्र, अशांचा अधिक्षेप करून मराठ्यांचा इतिहास केवळ दोषैकदृष्टीनें लिहून स्वातंत्र्य चळवळीची माहिती अधिक चांगली कळावी हा हेतु आमच्या सरकारी प्रकाशनाचा आहे काय ? इतिहासकाराला "स्वातंत्र्य" असावें. पण त्यानें तें योग्य प्रकारें उपयोजिलें नाहीं तर ? ऐतिहासिक सत्यशोधनाच्या नांवाखालीं विपर्यास, अनैतिहासिक विधानें आणि ज्ञातिद्वेष फैलावण्यास मदत व्हावी हा इतिहासाचा मोठ दुरुपयोग होईल, मिस् मेयो किंवा बेव्हली निकोलस सारख्यांच्या लेखणींत, शाईंत, जहर असतें. दृष्टिकोनांतच दोष असतो – तो एकदोन लेख लिहून स्पष्ट करतां येत नाहीं – तसेंच ह्या ग्रंथाचें आहे – जवळ जवळ तोच दोष आम्हां मराठ्यांबाबत ह्या इतिहासकाराच्या दृष्टींत आहे. त्याचा मदतनीस "मराठा इतिहासाभ्यासू" आहे. एवढ्यावर ह्या आरोपाची नाशाबिती होत नाहीं. भारत सरकारच्या अधिकृत प्रकाशनांत महाराष्ट्रेतिहासाबद्दल असा दुष्टभाव असावा हें अत्यंत अनिष्ट होय. भलतेंच गैरसमज पसरविणारें मत एकदां रूढ झाल्यावर त्याचें निराकरण कठिण होतें. आमच्या महाराष्ट्र राज्याधिकाऱ्यांना याबाबतींत – ह्या अन्यायाबाबत – कांहीं दाद मागतां येते कीं नाहीं तें संबंधित अधिकाऱ्यांनीं पहावें – दिल्लीपर्यंत राज्यसरकारचें मत तरी पोचावें एवढी इच्छा आहे. मराठी इतिहासाचा विपर्यास साहेबांनीं केला नाहीं – इतका स्वकीयांनीं अखिल भारतीय सरकारी आश्रयानें केला ! मराठी इतिहासाचें हें नष्टचर्य केव्हां संपणार ?

---










प्रा. श्री. शिवनारायण राय : अनु. अशोक शहाणे

# जां जेने : अनैतिक प्रतिभा

कवींना दैवी प्रेरणा मिळालेली असते हें निःसंकोचपणें कबूल केल्यावरसुद्धां आपण कल्पिलेल्या प्रजातंत्रांत कवींना स्थान देण्याचें धाडस प्लेटोच्यानें झालें नाहीं. त्यानें असा हिशेब मांडला कीं कवींच्यांत बाकी वाटेल तितके गुण असले तरी त्याला विवेकाचें सोयरसुतक नसतें आणि तर्कशुद्ध बुद्धीच्या आदेशाप्रमाणें जीवन व्यतीत करण्याचें सामर्थ्य त्याच्यांत नसतें. सत्यासत्य, न्यायान्याय यांतील फरक कविलोक थोडाच मानतात ? त्यांच्या चारित्र्यांत सुजनता आणि निष्ठा यांचा अभाव अत्यंत प्रबळ असतो. म्हणून सज्जन समाजांतून कवींना हांकलून देण्याखेरीज दुसरा इलाजच नाहीं.

आतां प्लेटोच्या ह्या हिशेबांत कितपत सुसंगति आहे किंवा मुळांत सुसंगतीच आहे कीं नाहीं ह्याची चर्चा करण्याचा माझा हेतु नाहीं. पण होमर, कालिदास, लिपो किंवा शेक्सपियर ज्या समाजांत वाह्यात ठरतात, तो समाज कितीहि कुलीन असला तरी त्यांच्या टोळींत डेरा ठोकण्याची माझी एवढीसुद्धां इच्छा नाहीं. अन् याबद्दल मला आनंद होतोय्. तरी सुरवातीलाच प्लेटोची आठवण व्हायचें कारण अलीकडेच एका असामान्य प्रतिभाशाली साहित्यिकाचें लिखाण वाचतां-वाचतां एकसारखी प्लेटोनें कवीविरुद्ध केलेल्या ह्या तक्रारीची आठवण व्हायला लागली. कवींच्याबद्दल प्लेटोनें जें कडवट विधान केलें आहे तें ह्या साहित्यिकाला पुरेपूर लागू पडतें. आणि असें असूनसुद्धां (सार्त्रच्या मताप्रमाणें म्हणूनच) ह्या साहित्यप्रतिभेच्या सान्निध्यांत आल्यावर रसिक वाचक गडबडल्यावांचून अन् मुग्ध झाल्यावांचून रहात नाहीं.

लेखकाचें नांव आहे जां जेने. पॅरीसमधें एकोणीसशे-दहा सालीं त्याचा जन्म झाला. मुलाचे वडील कोण ह्याचा कांहीं पत्ता नव्हता. आणि आई पोराला जन्मानंतर लगेच टाकून देऊन पळून गेली. एका सहृदय शेतकऱ्यानें सरकारी अनाथाश्रमांतून ह्या मुलाला घेऊन येऊन त्याचें पालनपोषण केलें. परंतु बाल्य मित्रांच्या संगतीनें जेनेनें बालवयांतच चोरीचे धडे आत्मसात् केले. दहाव्या वर्षीं हातोहात पकडला गेल्यामुळें त्याला एका रिमांड होममधें धाडण्यांत आलें. तिथें आणखी अनेक विद्यांत पारंगत होऊन जेनेनं मुरलेल्या पापी माणसाचें आयुष्य जगायला सुरवात केली. कित्येक वेळां सांपडल्यामुळें जेने फ्रान्सच्या कुख्यात फॉरिन लिजनमधें सामील झाला. पण तिथें विशेष संधि मिळाली नाहीं म्हणून तो एका देशांतून दुसऱ्या देशांत सारखा पळत राहिला. चोरी, भीक मागणं, भडवेगिरी, चोरीच्या मालाचा व्यापार इत्यादि वेगवेगळ्या बेकायदेशीर धंद्यांत जेनेनें हात घातला होता. त्यामुळें सबंध युरोपांत असा एकहि देश आतां उरलला नाहीं कीं जिथल्या तुरुंगांत जेनेला थोडे दिवस सक्तीची विश्रांति मिळाली नाहीं.

गेल्या महायुद्धाच्या सुमारास असेंच एका जेलमधें घण मारतांमारतां जेनेला एकदम लिहिण्याची हुक्की आली. १९४२ सालीं जेलमधेंच बसल्याबसल्या त्यानें आपलें पहिलें पुस्तक लिहिलें : Notre-Dame des Fleurs. नंतर ४३ सालपासून ते ४८ सालपर्यंत त्यानें पुष्कळ पुस्तकें लिहून हातावेगळीं केलीं. तीन कादंबऱ्या : Miracle de la Rose, Pompes Funebres, अन् Querelle de Brest; एक कवितासंग्रह; दोन नाटकें : Les Bonnes, Haute, surveillance. आणि सर्वांत शेवटीं त्याचें सर्वांत गाजलेलें पुस्तक–'चोराची रोजनिशी' ( Journal du voleur ). कांहीं रसिक व्यक्तींनीं त्याच्या ह्या सर्व पुस्तकांचीं हस्तलिखितें वाचून आश्चर्यानें थक्क होऊन त्या पुस्तकांचें मर्यादित संस्करण प्रकाशित करण्याची व्यवस्था केली. त्यामुळें रसिक फ्रेंच वाचकांत जेनेचें नांव जोरांत पसरलें. अनेक विदग्ध समीक्षकांच्या मतें गेल्या वीस वर्षांत फ्रेंच गद्यसाहित्यांत जेनेच्या तोलाची प्रतिभा दिसलेली नाही.










अनुक्रमणिका

परंतु गोष्टी-नाटकें लिहीत असतांनाहि जेनेनें आपला मूळ धंदा सोडला नाहीं. १९४८ सालीं त्याला परत अटक झाली. फ्रान्समध्यें तो पोलीसांच्या हातांत बारा वेळां सांपडला होता. कोर्टानें त्याला जन्मठेपेची शिक्षा ठोठावली. तेव्हां फ्रान्समधल्या अनेक नामांकित साहित्यिकांनीं राष्ट्रपतींना जेनेच्या सुटकेची मागणी करणारा अर्ज दाखल केला. ह्या अर्जावर क्लोदेल, जिद् , कोक्तो, जां-पोल सार्त्र इत्यादींच्या सह्या होत्या. ह्या अर्जामुळें शेवटीं राष्ट्रपतींच्या आज्ञेनें जेनेला सोडून देण्यांत आलें.

पण सुटका झाल्यापासून जेनेनें लिहिणेंहि सोडून दिलें. तरी दरम्यान एका प्रख्यात प्रकाशनसंस्थेनें जेनेच्या समग्र साहित्याची एक स्वस्त आवृत्ति प्रकाशित केली आहे. शिवाय १९५२ सालीं सार्त्रने जेनेच्या साहित्यावरील निबंध व त्यानेंच लिहिलेलें जेनेचें चरित्र यांचें पुस्तक बाहेर पडलें आहे. तेव्हां फ्रेंच साहित्यांत जेनेला एक कायम स्थान मिळालें आहे, यांत शंका नाहीं. गेल्या कांहीं वर्षांत त्याच्या अधिकांश साहित्याचे इंग्रजी अनुवादहि प्रकाशित झाले आहेत.

जेनेची जीवनकथा ही अशी आहे. आतां अशा माणसाला आपली मुलगी द्यावी असें कुणाच सज्जन बापाला वाटणार नाहीं. आणि प्लेटो जर फ्रेंच प्रजासत्ताकाचा राष्ट्रपति असता तर जेनेची काय अवस्था झाली असती ह्याची कल्पना करणें कांहीं कठीण नाहीं. परंतु माणूस दुर्जन आहे म्हणून काय त्याचें लिखाणहि अवाचनीय ठरतें ? एक मॉरिआक् सोडला तर समकालीन कोणी फ्रेंच साहित्यिक हें मानत नाहीं. जेनेची गद्यशैली व्यंजना-संपदेनें आश्चर्यकारकरीत्या समृद्ध आहे एवढेंच नव्हे तर त्याच्या सबंध साहित्यांत जी अनुभूतिशीलता आहे तिची शून्यवादाची दिशा पटो किंवा न पटो पण तिचा प्रामाणिकपणा, खरेपणा; तिची खोली आणि झेंप मानण्यावांचून गत्यंतरच नाहीं. त्यामुळें लेखकाच्या दार्शनिक, नैतिक किंवा राजकीय प्रत्ययाला न मानतांहि त्याचा अनुभव, त्याची कल्पनाशक्ति, त्याची शैली यांचा रसास्वाद घेण्याबाबत आग्रह धरणारा माझ्यासारखा वाचक जेनेचें साहित्य वाचून मुग्ध झाल्याशिवाय राहात नाहीं.

समकालीन फ्रेंच विचारवंतांत जेनेच्या प्रतिभेचें सर्वांत जास्त कौतुक वाटतें सार्त्रला. आणि त्यानें जेनेला अस्तित्ववादी ठरवलें आहे. परंतु अशा प्रकारें कोणत्याहि तत्त्वज्ञानाचें लेबल जेनेच्या साहित्यकृतींवर लावणें मला सुसंगत वाटत नाहीं. जेनेच्या अनुभूति, त्याचे विचार, त्याच्या कल्पनेचा सगळा मालमसाला त्याला निव्वळ स्वतःच्या आयुष्यांतून मिळालेला आहे. पुस्तकांच्या परोक्ष जगांतून त्यानें विशेष कांहीं घेतलेलें नाहीं. कोणताहि तत्त्वज्ञानाचा ग्रंथ न वाचतां समाजाच्या सर्वांत खालच्या व किळसवाण्या थरावर सारें आयुष्य घालवल्यामुळें ह्या गुंतागुंतीच्या नि एकसारखें बदलत राहणाऱ्या जगांत नित्य सत्य म्हणून कांही चीज नाहीं असा अनुभव त्याला आला. आपण जें कांहीं पहातों, ज्याची-ज्याची म्हणून कल्पना करतों, किंवा जें-जें समजून चालतों, तें सर्वच खरें म्हणजे प्रतिभासात्मक व सापेक्ष सत्य असतें. आणि जेने हा हाडाचा कादंबरीकार आणि नाटककार आहे, तो तत्त्वज्ञ नाहीं. म्हणून त्यांनीं ही गोष्ट मुद्दाम माणसाच्या बाबतींत प्रत्यक्ष करून दाखवली आहे. उदाहरणार्थ : ज्याला आपण चोर म्हणतों, तो खरें म्हणजे जे त्याला चोर म्हणतात आणि चोर म्हणून शिक्षा देतात, त्यांच्या कल्पनेनें निर्माण केलेला असतो. हें कल्पनेंतलें अस्तित्व सोडलें तर वास्तविक चोर म्हणून कुणी प्राणी अस्तित्वांत नाहीं. तीच गोष्ट पोलीस, वेश्या, श्रीमंत, लंपट, साधू, खुनी, शूर, ज्ञानी वगैरेंच्या बाबतींत. वेश्यागिरी, श्रीमंती, साधुता इत्यादी अशरीरी कल्पनांना कांहीं शारीरिक अस्तित्वच नाहीं. इतकेंच काय पण आपण स्त्री आणि पुरुष यांमध्यें भेद करतों, जेनेच्या मतें हीहि फक्त एक सापेक्ष कल्पना आहे.

मग जेनेला असें वाटतें का, कीं ह्या सर्व कल्पनांच्या पलीकडे व्यक्तीची स्वकीय अशी कांहीं सत्-ता आहे ? तर नाहीं. व्यक्तीच्या स्वभावांतील ऐक्यावरहि त्याचा विश्वास नाहीं. प्रत्येक माणसाचा स्वभाव दुसऱ्या माणसांच्या कल्पनेंतून जन्मलेला असतो. स्वभाव हा फक्त माणसाचा मुखवटा आहे, आणि तो मुखवटा त्याला बाहेरून मिळालेला असतो. एक मुखवटा काढला तर दुसरा मुखवटा असतो. कारण चेह-










अनुक्रमणिका

त्याची घडण आणि त्याच्याआड मनाची घडण ह्या गोष्टी वास्तविक दुसऱ्याच्या कल्पना असतात आणि त्यांची घडणहि त्यानें आपल्या अपेक्षेच्या साच्यांतून घडवलेली असते. संभोग, प्रेम, चौर्यवृत्ति किंवा वेश्यावृत्ति, खून, क्षमता वाढवण्याचे प्रयत्न, आदर्शांचें अनुकरण, समाजाविरुद्ध बंड--इत्यादी गोष्टींतून माणूस आपल्या मुखवट्याचा गुदमरवून टाकणारा आडपडदा दूर करण्याचा प्रयत्न करतो. परंतु सरतेशेवटीं ह्या सगळ्या प्रयत्नांची परिणती होते एका मुखवट्याऐवजीं दुसऱ्या मुखवट्याचा आश्रय घेण्यांत, चांगलें-वाईट, खरें-खोटें, न्याय-अन्याय याबाबत आपण जो दंभ बाळगतों, तो खरा म्हणजे ह्या न भरतां येण्याजोग्या पोकळीच्या भयानक जाणीवेला दडपण्याचा प्रयत्न असतो. प्रत्येक माणूस हा दुसऱ्या माणसांच्या कल्पनांचीं प्रतिबिंबें असतो. म्हणून व्यक्तीच्या चरित्रांत काय किंवा समाज-संस्कृतींत काय नित्य-सत्याचा शोध घेणें ही निव्वळ आत्मवंचना आहे.

जेनेच्या जीवनावरील दृष्टिकोनाचें स्पष्टीकरण करतांना सार्त्रनें प्राचीन ग्रीक तत्त्वज्ञानांतील एक उदाहरण दिलें आहे. "क्रीट देशांतील तत्त्वज्ञ एपिमेनिडेस म्हणाला होता कीं क्रीटचे नागरिक खोटारडे आहेत. परंतु एपिमेनिडेस स्वतःच क्रीटचा नागरिक होता. म्हणून त्याचें विधान खरें नाहीं. म्हणजेच क्रीटचे नागरिक खोटारडे नाहींत. म्हणजे क्रीटचा नागरिक एपिमेनिडेस खरें बोलला होता, कीं क्रीटचे नागरिक खोटारडे आहेत. म्हणून एपिमेनिडेससुद्धां खोटारडा आहे..." ह्याचा अर्थ असा कीं खरें आणि खोटें दोन्ही एकाच चाकावर फिरत असतात. सत्यापासून सुरवात केली तर असत्याशींच पोंचावें लागतें आणि असत्यापासून सुरवात केली तर सत्याशीं पोंचावें लागतें. ह्या चाकाला थांबवण्याचा कांहीं मार्ग नाहीं.

वरील वादांतील चूक दाखवणें कदाचित् फारसें कठीण नसेल. परंतु जेने कांहीं तत्त्वज्ञ नाहीं. तेव्हां त्याच्या विचारांतील चूक दाखवण्याचा प्रयत्न करणें व्यर्थ आहे. वास्तविक प्रश्न वेगळाच आहे : इतक्या वांझ शून्यवादाचा आश्रय घेऊन कोणीहि लेखक साहित्यनिर्मिति कशी करूं शकतो ? जेनेचें लिखाण हें ह्या प्रश्नाचें उत्तर आहे. खरें म्हणजे एखाद्या दार्शनिक तत्त्वाची प्रतिष्ठा करणें हा जेनेचा उद्देशच नाहीं. आणि तें त्याच्या आवांक्यांतलेंहि नाहीं. स्वतःच्या व आपल्या भोंवतींच्या माणसांच्या जीवनांत जी भयानक पोकळी त्यानें अनुभवली, तिचेंच आर्त, नग्न रूप आपल्या प्रतिभा व शैलीच्या जोरावर आमच्या मनांत प्रत्यक्ष करण्याचा त्याचा हेतू आहे. ह्या त्याच्या अनुभूतींत कांहीं फट नाहीं, ह्या रूपांत थोडीशीहि अस्पष्टता नाहीं. ह्या शून्यतेविषयींची त्याची कल्पना कदाचित् आपल्याला भ्रामक वा अर्धसत्य किंवा अतिदुष्ट वाटेल. पण त्याच्या कादंबऱ्या, नाटकें आणि रोजनिशी वाचल्यानंतर शून्यतेची ही अनुभूति आणि त्यामुळें निर्माण झालेल्या वेदनांचा गंभीर खरेपणा आपल्या तयार नसलेल्या कल्पनेंतसुद्धां भयंकर वादळ माजवते. त्यामुळें आपल्या दैनंदिन जीवनांतली अंगवळणीं पडलेली तामसी शांति निदान तेवढ्यापुरती तरी मोडते-संपते आणि जीवनाबद्दल कुतूहल मनांत जागें होतें. ह्या जागृतींतच साहित्याची सार्थकता आहे. आणि हा जागृतीचा आनंद होतो म्हणूनच शून्यतेची वेदना आपल्याला नकोशी वाटत नाहीं.

ह्या दुःसह शून्यतेची जाणीव जेने आपल्या मनांत तात्त्विक चर्चेनें न करतां पात्रांच्या स्वभावरेखा व घटनांच्या द्वारां करतो. आणि तरी तो आपल्याला पावलोंपावलीं बजावतो कीं माझ्या कादंबरी वा नाटकांतील पात्रें संपूर्णतः खोटीं व काल्पनिक आहेत. तीं ज्यांचीं प्रतीकें आहेत, त्यांना खरें अस्तित्वच नाहीं. त्यांची ही अधांतरि स्थिति त्यांच्या अनतिक्रम्य शून्यतेचीच एक बाजू असते. परतु जर सगळें एवढ्यावरच संपतें तर ह्या पात्रांनीं व घटनांनीं आपल्या मनावर विशेश ठसा उमटवला नसता. खरें म्हणजे जेनेनें आयुष्यभर अनुभवलेली शून्यतेची जाणीव त्याच्या कलासक्तीमुळें त्यानें कल्पिलेल्या रूपांत सत्याची अनिवार्यता खेळवते. जें स्वतः संपूर्णतः शून्य आहे, त्याला शून्यतेच्या वेदनांचा अनुभव येणें निव्वळ अशक्य आहे. परंतु जो स्रष्टा आहे, त्याची जाणीव शून्यगर्भ असूं शकत नाहीं. त्याची आंत लपलेली सपदा विपुल असते; आणि त्याचमुळें शून्यतेच्या वेदना त्याच्याइतक्या तीव्रपणें दुसरा कोणी अनुभवूं शकत नाहीं. त्याच्या अपरोक्षानुभूतीच्या समर्थनांत शून्यतेच्या कल्पनेनें प्रत्यक्ष








शून्यतेला ओलांडून अस्तित्वाची स्वतःसिद्धता मिळविलेली आहे.

जेनेचें एखादें लिखाण घेऊन थोडी चर्चा केली तर कदाचित् माझें म्हणणें अधिक स्पष्ट होईल. सार्त्रच्या मतें सर्वोत्कृष्ट असलेली जेनेची साहित्यकृति, Les Bonnes (The Maids) हें नाटकच आपण घेऊं. नाटकांत तीन पात्रें आहेत. घरांतली मालकीण किंवा मादाम (वय पंचवीसेक वर्षे) व तिच्या दोन दासी, सोलांज आणि क्लेअर. ह्या दोन दासी बहिणी-बहिणी आहेत. त्यांची वयें तीसपासून पस्तीसच्या दरम्यान. यांत सोलांज थोरली. ह्या पात्रांशिवाय रंगमंचावर उपस्थित नसलेलें परंतु गोष्टींत महत्वाचा घटक असलेलें एक पात्र आहे : मादामचा प्रियकर किंवा मॉंशिअ. पडदा उघडल्यावर मादामच्या शय्यागारांत सोलांज आणि क्लेअर् दृष्टीस पडतात. मालकिणीच्या गैरहजेरींत क्लेअर् मालकीण बनून मादामसारखें वागत आहे आणि सोलांज् क्लेअरच्या भूमिकेंत मादामरूपी क्लेअरच्या हुकमाची तामिली करत आहे. त्यांच्या बोलण्यावरून व अभिनयावरून क्रमशः दोन गोष्टी स्पष्ट होतात : ह्या दोघींना मादामबद्दल जसें आकर्षण आहे तसेंच तिच्याबद्दल रागहि आहे; त्याचप्रमाणें ह्या दोघींचें परस्परांवर जसें प्रेम आहे तशीच त्यांना एकमेकींबद्दल किळसहि वाटते आहे, ह्यांना स्वतःच्या जीवनांत कांहीं रस नाहीं. आणि त्या जीवनाच्या वर फक्त एकाच प्रकारच्या जीवनाची त्या कल्पना करूं शकतात : मादामच्या जीवनाची. ह्यांचा स्वभाव आणि ह्यांचें स्वप्न, दोन्ही मादामशीं असलेल्या ह्यांच्या संबंधानें नियंत्रित-आहेत. ह्या संबंधाविरुद्ध बंड पुकारलें तरी त्याच्या नियंत्रणांतून मुक्त होण्याचें सामर्थ्य यांच्यांत नाहीं. नंतर आपल्याला असें कळतें कीं क्लेअरनें निनांवी पत्र लिहून पोलिसांना मादामच्या प्रियकराच्या काल्पनिक दुष्कर्माविषयीं कळवलें आहे आणि त्यामुळें मादामचा प्रियकर सध्यां तुरुंगांत आहे. इकडे सोलांजनें रात्रीच्या अंधारांत मादामचा खून करण्याचा प्रयत्न केला होता, परंतु मादामचें निद्रिस्त रूप पाहून शेवटीं ती परत फिरली होती. हें सगळें बोलणें होत असतांनाच टेलिफोनची घंटा वाजते. मॉंशिअ टेलिफोनवरून कळवतो कीं पुराव्याअभावीं पोलिसांनीं आपली सुटका केली आहे. दोन्ही बहिणींना काळजी वाटूं लागते : निनांवी पत्र पाठविल्याचा आपला कट आतां उघडकीला येणार. मग त्या ठरवतात कीं मादाम घरीं परत आल्यावर तिच्यावर विषप्रयोग करून तिला मारायचें. नंतर मादाम येते. पण तिला विष चारण्यापूर्वीच चुकून क्लेअर् मॉंशिअच्या सुटकेची बातमी सांगते. मादाम तातडतोब घाईघाईनें मॉंशिअला भेटण्याकरतां परत बाहेर जाते. मादामकरतां बनवलेला विष मिसळलेला चहा तसाच गार होत राहतो. अतिशय अवसन्न झालेली क्लेअर शेवटच्या क्षणीं तो चहा पिऊन आत्महत्येच्या उपायानें आपल्या विशुद्ध ओलांडायचा प्रयत्न करते. रंगमंचावर एकटी उभी राहून जवळजवळ वेडी झालेली सोलांज् क्लेअरच्या मृत्यूंत मादामच्या मृत्यूचें स्वप्न पाहते. ह्या मृत्यूमुळें नांवाच्या नागपाशांतून सत्–तेची सुटका होतो.

नाटकांतलें प्रत्येक पात्र हें दुसऱ्या पात्राची सांवली आहे. एकींकडे दासींची घृणा, आकर्षण व सक्रिय कल्पना आणि दुसरीकडे वाईट चारित्र्याच्या प्रेमिकाची आशा यांमुळें मादामच्या शून्यतेला स्वभावरेखेचें आवरण प्राप्त झालें आहे. मॉंशिअचें पायहि मादाम व दासींच्या कल्पनेनें निर्माण केलेलें आहे. आणि सोलांज् आणि क्लेअर मादामच्या सांच्यांत घडवलेल्या आणि त्यांचें जीवन परस्परद्वेष, आकर्षण आणि निष्फळ इच्छांनीं नियंत्रित झालेलें. सारांश, ह्या नाटकांतील प्रत्येक पात्र इलियटच्या पोकळ माणसांच्या जातीचें आहे. परंतु त्यांच्या शून्यतेच्या केंद्रस्थानीं स्रष्टयाची शून्यतेच्या जाणीवेची वेदना क्रियाशील असल्यानें ही पोकळ बायकांची गोष्ट आपल्या मनाला घुसळून काढते.

जेनेच्या अनेक भक्तांना ह्या छोटया नाटकांत आधुनिक युरोपच्या कडवट वैफल्याचें प्रतिबिंब आढळलें आहे. जेनेची जीवनकथा फ्रान्स्वा व्हिलॉंसारखीच आहे. परंतु वृत्तीनें तो आधुनिक शून्यवादी कलाकारांचा सगासोयरा आहे.

---








श्री. ग. मो. पाटील

# मराठी व्याकरणाची पुनर्व्यवस्था

[ लेखांतील शुद्धलेखन लेखकाचें स्वतःचेंच आहे– का० संपादक ]

महाराष्ट्र शासनाने मराठी ही राज्यकारभाराची भाषा करण्याचे ठरविल्यामुळे, " मराठी असे आमुची मायबोली " म्हणून अभिमानाने पुकार करणाऱ्या कवीच्या अंतःकरणाला " जरी आज ती राजभाषा नसे " असे लिहिताना जी वेदना होत होती, ती लवकरच दूर होईल आणी त्याच्या आत्म्याला शांती मिळेल. राजभाषा म्हणून गौरवाने नांदणाऱ्या भाषेचे व्याकरण तितक्याच तोलाचे असले पाहिजे. राजभाषा ही स्वतंत्र आणी परिपूर्ण भाषा असते. कित्येक वेळी ती अपूर्ण आहे असे आढळले तर इतर भाषा–भगिनी आपल्या साहित्योद्यानातील निवडक शब्दपुष्पे तिला प्रेमाने देतात, ती स्विकार करते परंतु अपूर्णता भासू देत नाही. प्रेमाने दिलेला उपहार स्वतःच्या दिवाणखान्यात स्वतःच्या तंत्राने मांडून राजभाषा आपला संसार थाटते आणि आपली प्रगती पुढे चालू ठेविते. भाषेचा दिवाणखाना आणी तिचे स्वतःचे तंत्र म्हणजेच भाषेचे व्याकरण! हे व्याकरण सर्वसुलभ आणि भाषेवरच आधारलेले असावे हा मुद्दा अत्यंत महत्त्वाचा आहे.

मराठी व्याकरणाची पुनर्व्यवस्था होणे अत्यावश्यक आहे ही गोष्ट विचारवंतानां पटली आहे. कुठल्याहि भाषेचे व्याकरण नियमांच्या चिरकालीन चौकटीत बसविणे हे कठीण आहे. भाषा ही प्रवाहिनी, गतिमती आणि उत्क्रांतशालिनी आहे. भाषा हे मानवी व्यवहाराचे चलन आहे. ती नेहमीच्या व्यवहारात वापरली जाणारी वस्तू आहे आणी त्यामुळे तिच्यात जरुरीप्रमाणे फरक होत राहणारच. शिवाय शासन, सांस्कृतीक सान्निध्य आणी आदानप्रदान इत्यादींमुळे अंतराअंतरावर भाषेतील शब्दव्यवहार आणी भाषेच्या लकबी बदलणे साहजीक आहे, ही गोष्टपण विद्वन्मान्य झाली आहे. 'किराया' 'कमरा', 'वापस' यासारखे कितीतरी शब्द आणी 'बाजारात वस्तू भेटत नाहीं', 'ती जाती', 'म्हणूनसाठी' यासारखे कितीतरी वाक्प्रचार मराठवाड्यांतील सुशिक्षीत आणी विद्वान लेखकांच्या नेहमीच्या बोलण्यात आढळतात व नवीनच ऐकणाऱ्या नवागताला वैचित्र्य जाणवते. पण हा काही दोष नाही. तेव्हा भाषेचे व्याकरण लिहिताना महत्वाची आणी अगत्याची गोष्ट लक्षात ठेवावयाची ती अशी की व्याकरण हे भाषेची तत्कालीन स्थिती दर्शविते. " वि+आ +करण" ही व्युत्पत्तीच हे विधान स्पष्ट करण्यास समर्थ आहे. परंतु व्याकरणकारांचा सामान्य दृष्टिकोण भाषा कशी आहे, हे दाखविण्यापेक्षा भाषा कशी असावी, याचे विवेचन करण्याकडेच असतो. भाषेचे वर्णन (description) करण्यापेक्षा भाषेचे विधेयक (prescription) निर्माण करण्याकडेच बहुशः त्यांचा कल असतो. भाषेच्या व्याकरणाचा अभ्यास करण्यापूर्वीच मनुष्य आपापली भाषा भोवतालच्या परिस्थित्यनुरूप शुद्ध बोलतच असतो आणी पुष्कळदा शुद्ध लिहितोही ! ( शुद्धलेखन म्हणजे काय हा वादाचा मुद्दा इथें मुद्दामच बाजूस ठेविला आहे ! ) परंतु तरीहि "शुद्ध कसें बोलावें आणी शुद्ध कसें लिहावें हें व्याकरण शिकल्यानें समजतें " असा व्याकरणकारांचा दावा असतो. जणूकाय व्याकरणाचा लवलेशहि नसलेल्या माणसाचे उभ्या आयुष्याचे व्यवहार अशुद्ध ( ? ) भाषेमुळे अडूनच राहिले होते व आहेत. अस्तु. परिणामी भाषेचा स्वतंत्रपणे निःपक्षपाती विचार करून व्याकरण लिहिण्यापेक्षा व्याकरणकार दुराग्रही बनतो. यामुळें त्या भाषेचे वास्तववादी सत्य स्वरूप दृष्टोत्पत्तीस न येता, व्याकरणकाराच्या मताने ती भाषा कशी असावयास हवी, याचेच चित्र व्याकरणातून दिसते. संस्कृत, ग्रीक, लॅटिन या भाषांच्या व्याकरणकारांनी त्या त्या भाषांच्या व्यवहाराचा पृथगात्मक अभ्यास करून पूर्वग्रहदूषीत न होता व्याकरणे लिहिली हे त्यांचे वैशिष्ट्य ! मराठी अगर इंग्रजी भाषांच्या व्याकरणकारांपुढे संस्कृत अगर लॅटिन भाषांची व्याकरणे असल्यामुळे त्यांबरहुकूम व्याकरणे लिहिण्याचा, भाषेबद्दलचे विधेयक निर्माण










अनुक्रमणिका

करण्याचा मोह त्यांना होतो, आणी मराठी भाषा खरोखर कशी आहे, यापेक्षा संस्कृत भाषेच्या व्याकरणाच्या दृष्टिने मराठी भाषेची कशी मांडणी करता येईल, याचाच व्याकरणकार विचार करू लागतो.

मराठी व्याकरण शिकतानां आणी शिकवितानां एक गोष्ट नेहमीच मनाला खटकते की संधिप्रकरणाचा मराठी व्याकरणाशीं संबंध काय ? व्यञ्जनान्त शब्द मराठीत नाहीत, त्यामुळे व्यंजनसंधी संभवतच नाहीत. विसर्गाचा आविष्कार संस्कृतपुरताच असून त्याचे मराठीत अस्तित्वच नाहीं, त्यामुळे विसर्गसंधी हा प्रकार उपरा ठरतो. राहता राहिला स्वरसंधीचा प्रश्न ! संस्कृतात ज्याप्रमाणे वाक्यातील शब्दामध्ये परस्पर संधी होतात, त्याप्रमाणें मराठीत घडते का ? दोन शब्दामधील तर राहूद्याच, परंतु शब्दाला जोडले जाणारे प्रत्यय व मूळ शब्द यामुळे निर्माण होणाऱ्या पदात तरी संधी मराठी भाषेत होतो का ? " माझ्याइतका, त्याउपर, आरडाओरड, माझ्याऐवजी " इत्यादी शब्दात संधिनियमांनी शिकविले जाणारे आणी विद्यार्थ्यांच्या स्मरणशक्तिला ताण देणारे स्वरसंधी कुठे होतात ? मग स्वरसंधी, विसर्गसंधी, व्यंजनसंधी यांची दावण मराठी व्याकरणात कशासाठीं ? व्युत्पत्तिच्या दृष्टिने आणी अर्थ समजण्याच्या दृष्टिने त्यांचा उपयोग होतो अगर व्हावा, यासाठी ते शिकविले जाणे इष्ट आहे असे कदाचित् कोणी आग्रहाने म्हणतील. पण ज्या वयात हे नियम शिकविले जातात, त्या वेळी व्युत्पत्तिशास्त्राची कल्पनातरी विद्यार्थ्याला असते का ? शिवाय मराठी भाषेच्या सखोल अभ्यासकाला हे ज्ञान इतर अनेक विषयांप्रमाणे नंतरही मिळविता येईल. त्यासाठी व्याकरणात संधीप्रकरण मुद्दाम घालण्याची आवश्यकता नाही. संस्कृत व्याकरणात सिद्ध असलेला एखादा विभाग, मराठी ही संस्कृतोद्भव भाषा आहे म्हणूनच केवळ मराठी व्याकरणांत आलाच पाहिजे, असा कांही नियम नव्हे. आणी असा अट्टाहास जेव्हां मराठीचा व्याकरणकार धरतो, तेव्हां तो मराठीचे व्याकरण लिहीत असून संस्कृत भाषेचे व्याकरण मराठी भाषेवर लादण्याचा प्रयत्न करीत आहे, आणी मराठी भाषेची जी प्रकृती नव्हे, ती सिद्ध करण्याचा खटाटोप करीत आहे असे आम्ही म्हणतो. यास्तव मराठी व्याकरण मराठी भाषेचा विवेचनात्मक अभ्यास करून त्या अनुरोधानेच लिहिले गेले पाहिजे.

मराठीच्या वर्णाबद्दलपण असाच आग्रह धरला जातो. खरोखर बोलली जाणारी आणी सामान्य जनात प्रचलीत असलेली मराठी भाषा घ्या. तिच्यात ऱ्हस्व आणी दीर्घ इ अगर उ त्याच्यामुळे होणारे अर्थभेद सिद्ध आहेत का ? संस्कृतात पित आणी पीत, सुत आणी सूत यांच्यात ऱ्हस्वदीर्घांच्या फरकाने जो अर्थभेद आढळतो तो मराठीत आहे काय ? पुर ( नगर ) आणी पुर ( नदीचा ) यातील जो भेद असण्याची शक्यता होती, तीपण नष्ट झाली, कारण पहिला "पुर"चे "पूर" असे तद्भव रूप करून आणी तारापूर, सारंगपूर इत्यादी शब्दांत वापरून त्या दोन्ही शब्दाना समानवर्णकात्मक ( Homophonous ) बनवून टाकले. शिर ( डोके ) आणी शीर ( शरिरातील ) याचा अर्थभेद दाखविणारे शुद्ध मूळ संस्कृत शब्द " शिरस् " असून तो " शिरसावंद्य " किंवा " शिरोभाग " या ठिकाणी संस्कृतच्या नियमाप्रमाणे वावरतो आणी " शीर नमविले " या ठिकाणी तो तद्भव होतो, हे विसरतात. शिरस् हा संस्कृत शब्द मूळ रूपात आढळत नाही, हे सत्य आहे. मग मराठीत इ व उ (किंवा ई व ऊ) अशी दोनच वर्णके (Phonemes) असून ऱ्हस्व व दीर्घ हे त्यांचे स्थानभेदाने होणारे उपवर्ण ( Allophones ) आहेत काय, याचा स्पष्ट विचार झाला पाहिजे. ऋ व ऌ, त्याचप्रमाणे अं व अः यांना स्वर म्हणणे भाषाशास्त्रदृष्ट्या कितपत ग्राह्य आहे, याचापण जाणत्या विद्वानांनी विचार करणे अवश्य आहे. मध्ययुगीन कालातील पोथ्यामधून "ऋषी" "ऋद्धि" हे शब्द "रुषी" "रुद्धी" असेच लिहिलेले आढळतात, आपल्या बोलण्यातही " रुषी, रुद्धी " ( आणी मराठवाड्याकडे तर रण ( ऋण ) हृदय, कृपा, कृष्ण इत्यादी उच्चार ) आढळतात. मध्यन्तरीच्या काळी मराठीतून ऋ चे उच्चाटन झाले असावे व त्याच्याऐवजी र, रु, री इत्यादी उच्चार प्रचलीत झाले असावे; परंतु इंग्रजी अमदानिच्या सुरवातीला संस्कृतभाषाकोवीद पंडितांनी लिहिलेल्या ग्रंथांमुळे त्या " ऋ " ची पुन्हा प्राणप्रतिष्ठा झाली असावी. " ञ् " वर्ण मराठीत आहे काय, हेपण पहावे लागेल. ज्या भाषेचे व्याकरण आपण शिकतो आहोत, ती भाषा आपली आहे, याची जाणीव आणी प्रत्यय अभ्यासकाला आला पाहिजे, तरच ते त्याच्या भाषेचे व्याकरण








ठरेल. अर्थात "ण" वर्णाबद्दल साशंक होणारे वाचक प्रश्न निर्माण करतील, की त्यांच्या भाषेत "ण" हा वर्ण नाहीच, तेव्हा तो का अभ्यासावा ? प्रश्न वास्तवीक आहे खासच ! "गाणें" ऐवजी "गानं" म्हटले आणी "पाणी" ऐवजी "पानी" म्हटले तर अशुद्ध का मानावे, अगर चूक का धरावे ? व्युत्पत्तिची कसोटी लावली, तर गान आणी पानी हे शब्द संस्कृतातील मूळ "गानम्" आणी "पानीयम्" वरुन आल्यामुळे तेच अधीक जवळचे आणी शुद्ध ठरतात. "मनुष्य"चे "मानूस" रूप अधीक शास्त्रीय आहे. गाणें, पाणी, लोणी, माणूस हे उपटसुंभ अपभ्रंश आहेत. पण परिस्थिती अशी आहे, की व्याकरण लिहिणारे आणी साहित्यनिर्मिती करणारे सर्व विद्वान हे संस्कृताभिनिवेशी वर्गाचे असल्यामुळे आजचे व्याकरण त्या धर्तिने लिहिले गेले आहे.

समासांच्या बाबतीतपण स्वतंत्र विचार झाला पाहिजे. संस्कृतात आहेत तेवढेच समास मराठीत रूढ आहेत, कीं मराठीने त्यातून काही कमी केले, अथवा काही वाढविले, याचे संशोधन झाले पाहिजे. शब्दयोगी अव्यय हा वदतोव्याघात शब्दप्रयोग मराठीत कधी व का रूढ झाला ? या शब्दप्रकाराचे स्वतंत्र आणी शास्त्रीय विवेचन केले गेले नाही व त्यामुळे या प्रकारच्या अव्ययाना मान्यता मिळाली, असे प्रस्तूत लेखकाचे मत आहे. अव्यय हा स्वतंत्र अर्थकांचा प्रकार (free morpheme) असेल, तर मग तो शब्दयोगी का ? आणी शब्दयोगी बद्ध अर्थक (bound morpheme) असेल, तर मग ते अव्ययांच्या सदरात कसे बसेल ? "वर, खाली, मागे, पुढे" इत्यादी अव्यये असतील, स्वतंत्र अर्थके असतील, तर "घरावर, झाडाखाली, दारामागे, भिंतीपुढे" या पदांमध्ये "घर+वर; झाड+खाली, दार+मागे, भींत+पुढे" अशी दोन स्वतंत्र अर्थके एकत्र आली, तरीहि त्यांचा समास झाला नाही, असे म्हणावयाचे काय ? समासाशिवाय दोन स्वतंत्र अर्थके एका पदात कशी येऊ शकतील ? मग हा समासांचा नवा प्रकार म्हणावयाचा काय ? मराठीच्या विभक्तिप्रकरणाबद्दल आणी क्रियापदांबद्दलपण असेच रचनात्मक लिहिणे शक्य आहे, स्वागतार्ह आहे.

महाराष्ट्र प्रदेशाचा विस्तार फार मोठा आणी त्यात बोलल्या जाणाऱ्या मराठी भाषेचे स्वरूपपण विविध आणी वैचित्र्यपूर्ण ! म्हणून एका ठिकाणच्या भाषेला (ती त्याप्रमाणेच बोलली जाते अथवा नाही, हा विवाद्य प्रश्न आहे !) प्रमाणभूत मानणें व्यवहाराच्या दृष्टिनें इष्ट आणी सोइचे असले, तरी मराठीच्या इतर बोलींच्या वैशिष्टयांचा त्या भाषेच्या व्याकरणात समावेश झाल्याखेरीज ते त्या भाषेचे परिपूर्ण व्याकरण होणार नाही आणी सर्व मराठी भाषिकाना "ते आपले व्याकरण आहे" असे वाटणार नाही. ज्यासाठीं अहोरात्र प्रयत्न चालले आहेत, ते भावनीक ऐक्यपण त्याशिवाय सिद्ध होणार नाही.

लिंगवचन प्रकरणातील गोंधळतर सुज्ञ माणसालापण क्षणभर बुचकळयात टाकील. नैसर्गीक स्त्रीपुंल्लिगाबद्दल कोणी दुराग्रह धरणार नाहीं, पण अचेतन वस्तूंच्या लिंगाबद्दल जेव्हा आग्रह धरला जातो, तेव्हा मात्र व्याकरणकार हा हुकुमशहा आहे की काय, अशी शंका येते. चहा "घेतला" की "घेतली", याबद्दल निर्णय देण्याचा व्याकरणकाराचा काय अधिकार ? एखाद्या निर्जीव वस्तुचे लिंगवचन भाषेच्या व्यवहारावरून ठरावे, हे उचीत होय आणी तेच व्याकरणास मान्य झाले पाहिजे. "शास्त्राद्रूढीबलीयसी" या सिद्धान्ताला शरण जाऊन निसर्गाच्या विरुद्ध जाऊनहि आद्यव्याकरणकार महामुनी पाणिनिला पत्नी शब्दासाठी "दाराः, भार्या आणी कलत्रम्" असे तीन भिन्न लिंगी शब्द मान्य करावेच लागले. अनेकवचनी रुपे भिन्न असावीत, हे ठीक आहे. पण "हजार पान जेवले", "पाचशे माणूस आला होता" या ठिकाणी ही रूढीच शास्त्राच्या मुळावर येते, त्याला काय करणार ? "घरांत" शब्द सप्तमीचे एकवचन आहे की अनेकवचन हे आजचे व्याकरण ठरवू शकत नाही. तेव्हा याबद्दलचे नियम म्हणजे दण्डविधान न मानता, ते भाषेच्या व्यापारानुसार सैलच असले पाहिजेत.

शब्दसिद्धिच्या प्रकरणाची पहाणीतर विशेष कसोशीने झाली पाहिजे. अर्जित शब्द, कृदन्त आणी तद्धित यांचा विचार होईल, त्याबरोबरच विभक्तिप्रकरणाच्या निर्णयानुरूप काहीं नवी भर यात घालणे योग्य होईल. शब्दाला विभक्तिप्रत्यय एकदाच लागतो










अनुक्रमणिका

आणि विभक्तियुक्त शब्द अव्यय बनतो. त्याला पुन्हा विभक्तिप्रत्यय लागत नाही; पण तद्धित प्रत्यय लागू शकेल का, लागत असला तर विभक्तियुक्त शब्दाला म्हणजे अव्ययाला प्रत्यय लागला म्हणजे नवा साधीत शब्द अव्ययावरून साधला, असे म्हणावयाचे काय? आज विभक्तिप्रत्यय मानला गेलेला अर्थक अशा विभक्तियुक्त पदाला लागला, तर नंतरचा प्रत्यय विभक्तिप्रत्यय की तद्धित प्रत्यय, याचा पण भाषेच्या व्याकरणात नव्याने विचार होणे अगत्याचे आहे. "तो रात्रीचा झोपतो, ती दिवसाची गाते" या वाक्यात "रात्रीचा" आणि "दिवसाची" या शब्दाचे स्थान काय? "घरातला" माणूस, "शाळेपासूनचे" अंतर या शब्दप्रयोगात आजच्या व्याकरणानुसार विधान शास्त्रीय आहे काय? कारकयुक्त असेल तर तो विभक्तिप्रत्यय, असे तत्त्व मानले की आजच्या व्याकरणात ज्या विभक्तिप्रत्ययाना कारकाशिवाय इतर अर्थ दाखविले जातात, त्याना विभक्तिप्रत्यय मानावयाचे की तद्धितप्रत्यय हा शास्त्रीय चर्चेचा प्रश्न आहे.

उच्चार भिन्नतेमुळे वाक्याचे अर्थ बदलतात ही गोष्ट सर्वमान्य आहे. "तो गावाला गेला" या वाक्याच्या उच्चारभिन्नतेने अर्थाच्या वेगवेगळ्या छटा स्पष्ट होतात. प्रश्नार्थक, उद्गारवाचक, विधानात्मक, त्याचप्रमाणे वाक्यातील वेगवेगळ्या शब्दावरील आघात बदलल्याने स्पष्ट होणारे अनेक अर्थ एका वाक्यातून निघतात. शास्त्रशुद्ध व्याकरणात याचा विचार नसेल तर ते अपूर्ण ठरेल.

भाषाशास्त्र दिवसेंदिवस प्रगत होत आहे. मराठी ही एक स्वतंत्र, प्रौढ, प्रगल्भ आणि प्रगत भाषा आहे. तेंव्हा भाषाशास्त्रीय दृष्टिकोणांतून अगदी स्वतंत्र पृथक्करण करून, इतर भाषांच्या व्याकरणाचा तौलनीक अभ्यास करून आणि व्याकरणशास्त्राच्या सिद्धान्तांचे अध्ययन करून मराठी व्याकरणाची पुनर्व्यवस्था करण्याची आवश्यकता आहे. नव्या महाराष्ट्राला असे शास्त्रीय आणि सुलभ व्याकरण लवकरच प्राप्त होवो, हीच सदिच्छा!

---











अनुक्रमणिका

श्री. भा. पं. बहिरट

# जॉन लॉक

## बुद्धिवादाचा पाया

युरोपच्या इतिहासांत सतरावें शतक युद्ध व क्रांतीनें भरलेलें आढळतें. पण या गोष्टीबरोबरच या शतकांत फार मोठें बौद्धिक कार्यहि घडून आलेलें दृष्टोत्पत्तीस येतें. या कार्यांत इंग्लिश तत्वज्ञ लॉक याची कामगिरी उठावून दिसण्याजोगी आहे. ब्रिटिश तत्वज्ञांमध्यें व्यावहारिक ज्ञानाची सावधता व प्रत्यक्षज्ञानावर भर देण्याची जागरूकता यांची परंपरा आजतागायत दिसते, तिचा पाया लॉकनेंच घातला असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. बुद्धिवादास विरोध करून गूढवादाकडे वळणारी प्रवृत्ति व वैचारिक गोंधळ यांच्यावर अत्यंत उपयुक्त व एकच असा उतारा म्हणून या परंपरेचें फार महत्व आहे.

इंग्लंडमधील समरसेटच्या सुंदर प्रदेशांतील रिंग्टन गांवीं जॉन लॉकचा जन्म २९ ऑगस्ट १६३२ या दिवशीं झाला. यावेळीं बेकनला जाऊन सहा वर्षें व शेक्स्पीअरला जाऊन सोळा वर्षें झालीं होतीं. एलिझाबेथच्या ऐश्वर्यशाली व उत्साही कालाची विस्मृति अद्याप जनतेस पडलेली नव्हती. स्पिनोझाचा जन्म याच वर्षीं झाला. देकार्त हॉलंडमध्यें यावेळी तत्वचिंतन करून भावी ग्रंथांची रूपरेषा आंखीत होता. हॉब्स वयाच्या पन्नाशीजवळ आला होता, पण अद्याप त्याची माहिती लोकांना झाली नव्हती.

## ऐतिहासिक परिस्थिति

लॉक जन्मला तेव्हां इंग्लंडच्या गादीवर पहिला चार्लस राज्य करीत होता. चार्लसच्या जुलमास जनता कंटाळली होती. पार्लमेंटला धाब्यावर बसवून त्यानें सुलतानी अंमल सुरू केला होता. प्यूरिटन पंथीयांचा निमोड करण्याचें सुरू झालें, तेव्हां सुमारें वीस हजार लोकांनीं आपलें ऐहिक व पारमार्थिक स्वातंत्र्य राखण्यास्तव देशत्याग करून अमेरिका गांठली, व तेथें लहान लहान प्रजासत्ताक संस्थानें स्थापिलीं. हें पाहून चार्लसनें अमेरिकेस जाणाऱ्या लोकांना मनाई करून त्यांचीं जहाजें परतविलीं. या परतविलेल्या जहाजांतील लोकांत पिम्, हॅम्पडन, ऑलिव्हर क्रॉमवेल सारखे पुढारी होते. यांना परदेशी जाऊं दिलें असतें, तर तत्कालिन इंग्लंडच्या इतिहासास निराळी कलाटणी मिळाली असती. राजा व पार्लमेंट यांमध्यें लौकरच यादवीयुद्ध सुरू झालें, त्यावेळीं लॉक दहा वर्षांचा होता. त्याच्या स्वातंत्र्यप्रिय पित्यानें पार्लमेंटच्या बाजूनें शस्त्र धारण केलें. ही यादवी सात वर्षें चालून शेवटीं चार्लसचा पराभव झाला. त्याची पार्लमेंटपुढें चौकशी होऊन त्याचा शिरच्छेद करण्यांत आला. क्रॉम्वेलच्या हातीं सर्व सत्ता आली.

## शिक्षण

या काळांतच लॉकचें शिक्षण चालू होतें. समरसेटमध्यें त्याचें बाळपण संपल्यावर १४ व्या वर्षी त्यास वेस्टमिन्स्टरच्या विद्यालयांत पाठविण्यांत आलें. तेथील शिक्षण संपल्यावर १६५२ मध्यें त्यास ऑक्सफर्डच्या महाविद्यालयांत प्रवेश मिळाला. तेथें अभ्यास करतांना त्याचा त्यावेळीं शिकविले जात असलेल्या मध्ययुगीन तत्वविचारांशीं परिचय झाला. तत्वज्ञानाची आवड मात्र या अभ्यासामुळें उत्पन्न न होतां, त्यानें केलेल्या देकार्तच्या ग्रंथाच्या खाजगी वाचनामुळें उत्पन्न झाली. मध्ययुगीन तत्वज्ञांच्या जडजंबाल शब्दसृष्टीच्या विरुद्ध देकार्तची प्रसन्न, निरागस भाषाशैली त्यास अत्यंत आकर्षक वाटली. व तत्वचिंतनाची गोडी लागण्यास तीच कारणीभूत झाली. तत्वज्ञानाचा अभ्यास संपवून एम्. ए. ची पदवी घेतल्यावर त्यानें वैद्यकशास्त्राचा अभ्यास करून बी. एम्. ची पदवी मिळविली. कांहीं काळ त्यानें वैद्यकीचा व्यवसायहि केला. १६६५ मध्ये ब्रँडनबर्गच्या दरबारीं असलेल्या इंग्लिश राष्ट्रदूताचा तो चिटणीस झाला. नंतर ऑक्सफर्डला कांहीं कालानें परत आल्यावर त्याची लॉर्ड अॅश्लेशीं ओळख झाली. हाच पुढें शाफ्ट्स्बरीचा अर्ल झाला.

## राजकीय ओनामा व सक्तीचा देशत्याग

शाफ्ट्स्बरी हा तत्कालीन प्रसिद्ध राजकारणी पुरुष होता. लौकरच त्याच्या कुटुंबाशीं लॉकचा जिव्हाळ्याचा संबंध जडला. तो स्नेही, चिटणीस, वैद्य व शिक्षक अशा निरनिराळ्या नात्यांत व्यक्त झाला. धर्मांप्रमाणेंच राजकारणांतहि लॉकचीं मतें पुरोगामी होतीं. त्यामुळें त्यानें व्हिगपक्षाची बाजू धरली व त्याबद्दल त्याला कांहीं गोष्टी सोसाव्या

लागल्या. शाफ्ट्स्बरीचा चालता काळ संपल्यावर लॉकवर देशत्यागाची पाळी आली. कांहीं वर्षे त्यानें फ्रान्समध्यें भटकण्यांत घालविलीं. त्यावेळचीं त्याचीं कांहीं टिपणें आहेत. त्यावरून त्याची सूक्ष्म अवलोकन शक्ति व जीवनाच्या सर्व अंगांकडे पहाण्याची व्यापक दृष्टि प्रगट होते. यानंतर १६८५ मध्यें तो हॉलंडमध्यें जाऊन राहिला. राजकीय परिस्थितींत त्याचें नांव गोंवलें गेल्यामुळें हॉलंडमधील पुढील ४ वर्षांच्या वास्तव्यांत कांहीं काल त्यास आपलें नांव बदलून वावरावें लागलें. तत्त्वज्ञानाच्या जीवनांत असा प्रसंग क्वचितच आढळतो. याच काळांत त्याचें चिंतन व लेखन चालू होतें. "मानवी बुद्धिविषयक प्रबंध" हें त्याचें सुप्रसिद्ध पुस्तक याच काळांत लिहिलें गेलें. बऱ्याच वर्षांपूर्वी लॉक आणि त्याचे मित्र यांची चर्चा चालली होती व त्या चर्चेतूनच हा ग्रंथ निर्माण झाला असें लॉक्नें ग्रंथाच्या प्रस्तावांत म्हटलें आहे.

## लिखाण

१६८९ मध्ये इंग्लंडची राजकीय परिस्थिति पालटली. दुसरा जेम्स हा पळून जाऊन त्याचें जागीं विल्यम ऑफ् ऑरेंजची स्थापना झाली. विल्यमचा व लॉकचा स्नेहसंबंध होता. त्यामुळें लॉक परत स्वदेशीं आला. पुढील दोन वर्षे त्याचें वास्तव्य वेस्टमिन्स्टरच्या खोल्यामध्यें होतें. हॉलंडमध्यें तयार करीत असलेल्या तात्विक लिखाणाची प्रयत्नपूर्वक पूर्तता करण्यांत व तें प्रसिद्ध करण्यांत हे दिवस गेले. त्यानें तत्त्वज्ञानाप्रमाणेंच धर्म, शिक्षण व राज्यव्यवस्थेवरहि लिखाण करून तें प्रसिद्ध केलें

## देहावसान

१६८९ त लॉक हा वेस्टमिन्स्टर सोडून लंडनपासून वीस मैलावर असणाऱ्या ओट्स् गांवीं जाऊन राहिला. तेथें तो लेडी मॅशॅम व तिचा पति सर फ्रान्सिस यांचा पाहुणा म्हणून शेवटपर्यंत राहिला. इ. स. १७०० त त्याच्या प्रबंधाची ४ थी आवृत्ति प्रसिद्ध झाली. ऑक्सफर्ड विद्यापीठानें या प्रबंधास पाखंडी ठरविलें ! पण तो सन्मानच होय असें लॉकला वाटलें. कांहीं वर्षांच्या दम्याच्या आजारानंतर १७०४ मध्यें ऑक्टोबरच्या २८ व्या तारखेस त्याचें देहावसान झालें. हायलेव्हर येथील प्रार्थनामंदिराच्या आवारांत त्याच्या मृतदेहाचा अंत्यविधि झाला. तेथें थडगें अद्याप दृष्टिगोचर होत आहे. लॉकच्या लिखाणांतून त्याचें सौजन्य, गाढ मित्र–प्रीति, सत्य संशोधनाची प्रामाणिकता, वैयक्तिक व राजकीय स्वातंत्र्याच्या महत्त्वावरील त्याचा दृढविश्वास, पावलोपावलीं प्रतीत होतो.

## मानवी बुद्धीचें निश्चित स्वरूप

देकार्तच्या तत्त्वविचाराची सुरवात संशयवादांतून झाली. स्पिनोझाची शाश्वत सुखाच्या शोधाकरितां झाली, तर लॉकची सुरवात व्यावहारिक गोष्टींतून झाली. लॉकनें वैद्यकीचा अभ्यास करतांना शारीरिक रोगचिकित्सा केली व हाच चिकित्सेचा प्रांत त्यानें राजकारण व अध्यात्मविद्येपर्यंत वाढविला. केवळ शरिराची चिकित्सा करून न थांबतां, त्यानें राजकारणरुपी समाजतनूची चिकित्सा केली. शेवटीं मानवी बुद्धीच्या रोगाचीहि चिकित्सा करण्याची तयारी केली. या चिकित्सेचें परिपक्व फळ म्हणजे वयाच्या साठाव्या वर्षी पुरा झालेला त्याचा मानवी बुद्धीवरील प्रबंध होय. या निबंधांत लॉकनें मनुष्याच्या बुद्धीस कोणते विषय गम्य आहेत व कोणते अगम्य आहेत याची चर्चा केली आहे.

या निबंधाच्या सुरवातीस लॉकनें 'वाचकांस पत्र' लिहिलें आहे. त्यांत या निबंधाची कल्पना कशी निघाली, याचा इतिहास दिला आहे. निबंधाच्या प्रसिद्धीपूर्वी सुमारे वीस वर्षे– १६७० च्या हिवाळयांत लॉकच्या खोलीवर त्याचे ५।६ मित्र जमून कांहीं प्रश्नांची चर्चा चालली होती. हे प्रश्न काय होते याबद्दल पत्रांत उल्लेख नाहीं, परंतु लॉकचा मित्र जेमूस् टिरेल यानें केलेल्या उल्लेखावरून ही चर्चा धार्मिक व नैतिक प्रश्नाबद्दल होती, असें समजतें. ही चर्चा चालली असतां शेवटीं अनेक अडचणी निर्माण झाल्या व चर्चेचा मार्गच थांबला. व सर्वच स्तंभित झाले. यावेळीं लॉकचे मनांत विचार आला, कीं आपली दिशाच चुकत आहे. कोणत्याहि प्रश्नाचा विचार करण्यापूर्वी आपली विचार करण्याची बुद्धि ही कोणत्या विषयाचें ज्ञान करून घेण्यास समर्थ आहे, तिची मर्यादा काय आहे, हें अगोदर समजून घेतलें पाहिजे. यामुळें चर्चेला योग्य

दिशा मिळते व बौद्धिक वादविवादाची शक्ति अनाठायीं खर्ची पडत नाहीं.

ज्ञानाच्या स्वरूपाचा हा प्रश्न उपस्थित करून लॉकनें युरोपिअन तत्वज्ञानास एक नवीन दृष्टिकोन प्राप्त करून दिला. भारतीय तत्त्वचिंतकांनीं या प्रश्नाचें महत्व लॉकपूर्वी दोन हजार वर्षे जाणलें होतें, हें गोतमांच्या न्यायसूत्रांवरून दिसतें. पाश्चात्य तत्त्वज्ञांनींसुद्धां ज्ञानाबद्दल, या प्रश्नाबद्दल विचार प्रगट केले होते. ग्रीक व मध्ययुगीन तत्वज्ञांच्या लिखाणांत या विषयावर बरेच उपयुक्त विचार विखुरलेले आढळतात. परंतु त्यांनीं या प्रश्नास मूलगामी महत्त्व दिलें नव्हतें. त्यांच्या सर्वसामान्य तत्वचिंतनांतून उद्‌भूत होणारी गोष्ट म्हणून त्यांनीं ज्ञानचर्चा केली होती. देकार्तच्या ग्रंथामध्यें गर्भित असणाऱ्या सूचनेचा विकास करणारा लॉक हा पहिला पाश्चात्य तत्वज्ञ होय. ही सूचना म्हणजे, तत्वज्ञानाची सुरवात ज्ञानविषयक चर्चेपासूनच म्हणजे प्रमाणशास्त्रापासूनच झाली पाहिजे, ही होय.

तत्वचिंतनांतील या मूलगामी व प्रथमतः आवश्यक असणाऱ्या चौकशीचें महत्व सांगतांना लॉक म्हणतो, कीं मनुष्याच्या बुद्धीमुळेंच इतर सर्व सचेतन वर्गामध्यें मनुष्यास श्रेष्ठत्व मिळालें आहे. त्यामुळेंच तो इतरांवर सत्ता चालवून लाभ करून घेऊं शकतो. म्हणून हा बुद्धीचा विषय केवळ त्याच्या थोरवीमुळें सुद्धां अत्यंत परिश्रमानें चौकशी करण्याच्या योग्यतेचा आहे. बुद्धि ही डोळयाप्रमाणें आहे. डोळा आपणांस सर्व पदार्थ दाखवितो, पण तो स्वतःची दखल घेत नाहीं; त्याप्रमाणें बुद्धि ही पदार्थांचें ज्ञान करून देते, पण स्वतःच्या ज्ञानाबद्दल उदासीनच असते. थोड्याशा अंतरावर ठेवून स्वतःचे ज्ञानाचा विषय स्वतःसच करणें, याला मोठें कौशल्य व परिश्रम लागतात. या कामीं जरी खूप अडचणी असल्या तरी थोडासा प्रकाश पडला व परिचय झाला, तरी आपणांस कितीतरी आल्हाद वाटेल; एवढेंच नव्हे तर इतर गोष्टींच्या शोधाच्या कामीं आपल्या विचारास योग्य मार्गदर्शन होण्याचा लाभहि पदरीं पडेल. लॉकनें हा प्रश्न हाताळतांना फार मोठी महत्वाकांक्षा न बाळगतां विनयशीलतेनें म्हटलें आहे, कीं " ज्ञानाच्या प्रांतांत बॉइल वा न्यूटनसारखे प्रतिभासंपन्न लोक आहेत. या प्रांतांत सामान्य कामगार म्हणून कांम करण्याची संधि मिळावी एवढीच माझी इच्छा आहे. थोडीशी जमीन स्वच्छ करतां आली व ज्ञानाच्या वाटेंत पडलेला थोडा केरकचरा लोटून काढतां आला, तरी पुष्कळ झालें ! "

लॉकनें आपल्यापुढें तीन गोष्टी स्पष्टीकरणार्थ ठेवल्या – ( १ ) आपल्या ठिकाणीं असणाऱ्या कल्पनांच उगमस्थान; ( २ ) आपल्या ज्ञानांत निश्चितपणा, तें खरें असल्याचा पुरावा व त्याचा विस्तार; ( ३ ) मानवी आकलनशक्तीच्या प्रांताची सीमारेषा स्पष्टपणें ठरवून त्या रेषेपलीकडील प्रदेशाबद्दल तत्वज्ञानानें चर्चा करण्याची निरर्थकता.

## ज्ञानाचें स्वरूप

विश्वांतील वस्तूंचें ज्ञान हें कल्पनांच्या द्वारें होतें. तेव्हां कल्पनेच्या स्वरूपाची छाननीं करणें म्हणजे ज्ञानाच्या स्वरूपाची छाननी होय. ती करतांना लॉकनें प्रथमच कांहीं कल्पना उपजतच असतात, या मताचा परामर्श घेतला आहे. हा परामर्श घेण्याचा हेतु, मनुष्याच्या ठिकाणीं असणारे परंपरागत पूर्वग्रह नाहीसे करणें व पोकळ आणि निरर्थक शब्द वापरण्याची प्रवृत्ति दूर करणें, हा होता. कांहीं कल्पना उपजतच असतात, म्हणजे मनुष्याच्या ज्ञानापैकीं कांहीं भाग उपजतच असतो, असें म्हणण्यांत अशा ज्ञानाचें सत्यत्व सिद्ध करण्याची व तें तपासून घेण्याची गरजच नाहीं, अशी अवस्था निर्माण होते व या अवस्थेंत अंधश्रद्धा निर्माण होते व वाढीस लागते. हें घडूं नये याकरितां लॉकची उपजत ज्ञानाची चिकित्सा होती. या चिकित्सेनें तो ज्ञानाचा पाया ढांसळून टाकीत नव्हता तर, त्याची रचना करीत होता. त्याचप्रमाणें या चिकित्सेचा हेतु बुद्धीस कळणारें स्वतःसिद्ध अगर अनुमानसिद्ध सत्य नाकारण्याचाहि नव्हता. अशीं सत्यें त्यानें मान्य केलेलीं आहेत. डोळयाला प्रकाशाकडे वळविल्यानें प्रकाश दिसतो, त्याप्रमाणें बुद्धीला सत्याकडे वळविल्यानें स्वतःसिद्ध सत्यें गोचर होतात, असें लॉकनें म्हटलें आहे. याचें उदाहरण गणितांतील सत्याचें देतां येईल. तीन हे दोनपेक्षां अधिक आहेत अगर तीन म्हणजे एक अधिक दोन, हें बुद्धीच्या प्रकाशांत समजतें. हें प्रत्यक्ष गोचर सत्य होय. अनुमान गोचर सत्य हें अशा प्रत्यक्ष गोचर सत्यावर आधारलेलें



अनुक्रमणिका






असतें व तेंहि बुद्धीस समजतें. अशा सत्याचें उदाहरण म्हणजे ईश्वराचें अस्तित्व होय. ईश्वराचें अस्तित्व प्रत्यक्ष सिद्ध करतां येत नसलें, तरी अनुमानानें करतां येतें.

उपजत कल्पना अगर ज्ञान याच्या अस्तित्वाविरुद्ध प्रमाणें देतांना लॉकनें नवीन जन्मलेलें मूल, मूर्ख माणूस अगर खेडवळ अशिक्षित व्यक्तीचीं उदाहरणें दिलीं आहेत. ज्यांना आपण उपजत असणारीं तत्वें म्हणतों, त्याचें ज्ञान या सर्वांना नसतें. ज्यांना आपण उपजत ज्ञान म्हणतों, तें अनुभवांतूनच मिळविलेलें अगर संपादन केलेलें असतें. कल्पना असतात, पण अव्यक्त असतात, व कालांतरानें व्यक्त होतात–जाणिवेंत येतात असें म्हटल्यास, जाणीव नसणाऱ्या कल्पना मानाव्या लागतात. परंतु मनांत कल्पना असणें, पण त्या मनास माहीत नाहींत असें म्हणणें, ही विसंगतीच होय. उपजत कल्पना असणें, याचा अर्थ मनास समजून घेण्याची शक्ति असणें, असा केल्यास सर्वच कल्पना अगर ज्ञान यास उपजत म्हणावें लागेल. व असें म्हणणें म्हणजे चुकीची भाषा वापरल्यासारखी होते. उपजत तत्वें मान्य न करणाऱ्यांत व वरील प्रमाणें अर्थ करून मान्य करणाऱ्यांत कांहीं फरकच उरत नाहीं व शाब्दिक कसरत केल्याप्रमाणें होतें. या लॉकच्या युक्तिवादावरून ज्ञानेशांनीं अमृतानुभवांत अज्ञानखंडण करतांना जगाला प्रकाशित करणाऱ्या ज्ञानास अज्ञान म्हणणारानें 'ज्ञान' शब्दा मागें फक्त 'अ' लावण्याची 'अ'पूर्व कामगिरी केली आहे, असें उद्गार काढले आहेत, त्याची आठवण होते.

### नीतितत्त्वांचा उगम

नैतिक तत्वें सुद्धां उपजत प्राप्त नसतात. तीं मनुष्याच्या बुद्धीवर अगर मनावर मुळांतच कोरून ठेविलेलीं असतात, असें म्हणतां येत नाहीं. तसें म्हटल्यास सर्व देशांत व सर्व तऱ्हेच्या माणसांत तीं सारखींच असावयास पाहिजेत; परंतु प्रत्यक्षांत निरनिराळ्या ठिकाणच्या नैतिक कल्पना व त्या मानण्याचीं कारणें भिन्न आढळतात. उदाहरणार्थ, करार पाळणें हें नैतिक आहे. तो कां पाळावयाचा असें परलोकींचा दंड अगर बक्षीस यावर विश्वास ठेवणाऱ्या खिश्चनास विचारल्यास, शाश्वत जीवन अगर मृत्यु याची सत्ता असणाऱ्या ईश्वराची तशी अपेक्षा असते, असें तो उत्तर देईल. हॉब्सचा अनुयायी, करार न पाळल्यास समाज-पुरुष शासन करील, असें म्हणेल. तर एकादा तत्वज्ञानी म्हणेल, कीं करार मोडणें ही गोष्ट माणुसकीला न शोभणारी आहे, म्हणून तो पाळला पाहिजे. सद्सद्विवेकबुद्धि असें आपण ज्यास म्हणतां, तीहि सर्वांत सारखी नसते. ज्यास आपण सदसद्विवेकबुद्धि म्हणतों, ती दुसरी कांहीं नसून आपल्या वर्तुणुकीबद्दल आपण बनविलेलें मत असतें. त्यामुळें रानटी लोक आपली रानटी कृत्यें त्यांच्या सदसद्विवेकबुद्धीस अनुसरून करीत असतात.

### धर्मकल्पना

नैतिककल्पना उपजत नसतात, त्याप्रमाणें धार्मिकहि नसतात. नैतिक कल्पनांप्रमाणेंच धार्मिक कल्पनाहि भिन्न देशांत भिन्न भिन्न आढळतात. कांहीं धर्मांत ईश्वराचें अस्तित्व मानलेलें असतें, तर कांहींत मानलेलें नसतें. ( उदा० बुद्ध व जैनधर्म ) त्याचप्रमाणें उपजत अशा धार्मिक कल्पना अगर ज्ञान म्हणून ज्यास म्हणतात, त्याची चिकित्सा केल्यास त्याचा उपजतपणा नाहींसा होतो. अगदीं बालपणीं वडीलधाऱ्या माणसांच्या सांगण्यावरून कांहीं धार्मिक कल्पना शिरलेल्या असतात. थोरपणीं हीं मुळें विस्मृत होतात व मूळ न सांपडल्यामुळें अशा कल्पना निसर्गदत्त अगर ईश्वरदत्तच असतात असें मानण्याकडे प्रवृत्ति होते.

### मनोरचना

लॉकच्या मतें मनुष्याचें मन हें प्रथम अगदीं कोरें करकरीत असतें. मुळांत तेथें कांहीं कल्पना नसतात. त्या सर्व अनुभवांतून येतात. मनाचें वर्णन करतांना त्यानें दोन उपमा वापरल्या आहेत. एक कोऱ्या कागदाची व दुसरी अंधाऱ्या खोलीची. कोऱ्या कागदावर अक्षरें मागाहून लिहिलीं जातात, अंधाऱ्या खोलींत प्रकाशकिरण अन्य स्थानांतून शिरतात; त्याप्रमाणें मनांत असणाऱ्या कल्पना अन्य स्थानांतून म्हणजे अनुभवांतून आलेल्या असतात.

### कल्पनांचें वर्गीकरण

कल्पना शब्द लॉकनें व्यापक अर्थानें वापरलेला आहे. बुद्धीच्या विचाराच्या प्रत्येक विषयास तो कल्पना म्हणतो. कल्पना या ज्ञानाची सामुग्री होय. ही सामुग्री दोन ठिकाणांतून मिळते. एक ज्ञानेंद्रियांच्या संवेदनांतून व दुसरी मनाच्या स्वतःच्या व्यापारांतून. आत्मनिरी-



अनुक्रमणिका






क्षणानें मनोव्यापाराचें ज्ञान होतें. विचार, इच्छा, भावना हे सर्व मनोव्यापार होत. तेव्हां कल्पनांचे दोन प्रकार याद्दष्टीनें होतात. इंद्रियसंवेदनाच्या द्वारां येणाऱ्या व आत्मनिरीक्षणाचे द्वारा ज्ञात होणाऱ्या. हा ज्ञानाचा कच्चा मालमसाला होय. यावर पुढें ज्ञानाची इमारत रचली जाते.

कल्पनांचें आणखी दुसऱ्या प्रकारचें वर्गीकरण करतां येतें. कांहीं कल्पना साध्या असतात, तर कांहीं संमिश्र असतात. मूळच्या साध्या कल्पनेंतून तुलना करणें, जोडणें वगैरे मनाच्या क्रियेनें संमिश्र कल्पना तयार होतात. साध्या कल्पना चार प्रकारच्या असतात: ( १ ) एकाच ज्ञानेंद्रियांतून येणाऱ्या-उदा. रंग, नाद, वास इ. ( २ ) एकापेक्षां अधिक इंद्रियांतून येणाऱ्या– उदा. आकृति, गति इ. ( ३ ) मनोव्यापाराच्या निरीक्षणांतून येणाऱ्या-उदा. विचार, इच्छा इ. ( ४ ) मनोव्यापार व बाह्येंद्रियें या दोहोंतून येणाऱ्या– उदा. सुख, दुःख, सत्ता, अस्तित्व इ. या सर्व प्रकारच्या साध्या कल्पना व ज्ञान यांचा संबंध अक्षरें व ग्रंथ याप्रमाणें असतो. ज्याप्रमाणें होमरचें इलिअडसारखें काव्य चोवीस मुळाक्षरांतून तयार होतें, त्याप्रमाणें या मूळ साध्या कल्पनांतून ज्ञान तयार होतें. त्यामुळें ज्ञानाच्या दृष्टीनें संमिश्र कल्पनाच महत्वाच्या असतात.

साध्या कल्पना या मनांतून उत्पन्न झालेल्या नसतात. मन नुसतें पहाण्याचें काम करतें. त्या नाहींशा करणें वा नवीन तयार करणें मनाच्या स्वाधीन नसतें. त्या ग्रहण झाल्यावर मनाची क्रिया सुरू होते. या क्रियेनें साध्या कल्पनांतून संमिश्र कल्पना तयार होतात. मनाची ही क्रिया मुख्यत्वें तीन प्रकारें होते. ( १ ) कांहीं साध्या कल्पना एकत्र करून संमिश्र कल्पना तयार करणें. सर्व संमिश्र कल्पना या रीतीनें बनतात ( २ ) संमिश्र अगर साध्या कोणत्याहि दोन कल्पना एकत्र आणून त्या एकत्र न करतां एकाजवळ एक ठेवून एकावेळींच पहाणें. या रीतीनें सर्व तऱ्हेच्या संबंधाच्या कल्पना निर्माण होतात. ( ३ ) एकाद्या कल्पनेपासून तिच्याबरोबर वास्तविक अस्तित्वांत असणाऱ्या सर्व कल्पना वेगळ्या करून तीच तेवढी बाजूस काढणें. या वेगळ्या निवडण्याच्या क्रियेंतून सामान्य कल्पना तयार होतात.

संमिश्र कल्पनांचे तीन वर्ग पडतात. ( १ ) प्रकार अगर गुणांच्या कल्पना ( २ ) पदार्थाच्या अगर वस्तूच्या कल्पना व ( ३ ) संबंधाच्या कल्पना. यांपैकीं पहिला वर्ग जो प्रकार किंवा गुण ते दुसऱ्या कशाच्या आधारानें राहूं शकणारे असतात. ज्या वस्तूचे ते गुण किंवा अवस्था असतात, त्यावांचून त्यांची कल्पना करतां येत नाहीं. आतां कांहीं गुण हे नेहमीं एकत्र रहात असलेले आढळतात. त्यांच्या ऐक्यास आधार असलेलें सूचित होतें व त्यास आपण पदार्थ अगर वस्तू म्हणतों. हा दुसरा वर्ग होय. पदार्थांचें वास्तव स्वरूप मात्र अज्ञेय असतें. पदार्थांनीं मनाच्या बाहेर सत्य गोष्टींचें अस्तित्व आहे, हें समजतें. परंतु तिसरा वर्ग जो संबंधांच्या कल्पनांचा असतो, तो बुद्धींतूनच निर्माण झालेला असतो. संबंध हे बाह्यजगांत अस्तित्वांत नसतात, तर ते बुद्धीनेंच निर्माण केलेले असतात.

याप्रमाणें कल्पनांचा उगम व प्रकार यांची मीमांसा लॉकनें केली. त्यानंतर त्यानें कल्पनांचें ज्ञानदृष्ट्या मूल्य-मापनहि केलें. तत्वज्ञानाच्या दृष्टीनें कोणत्या कल्पना यथार्थ ज्ञान देणाऱ्या आहेत व कोणत्या नाहींत, हेंहि पहाणें अगत्याचें असतें. लॉकच्या मतें मूळ विषयास तंतोतंत धरून असणारी कल्पना सत्य होय. तो विषय एकादा अस्तित्वांत असलेला अगर शक्य असलेला पदार्थ असो, वा पदार्थाची कल्पना असो. धरून नसणाऱ्या अगर विसंगत असणाऱ्या कल्पना असत्य होत. उदाहरणार्थ चार बाजूंच्या त्रिकोणाची अगर धैर्यशाली भित्रेपणाची कल्पना या विसंगतपणामुळें असत्य होय. कल्पना या अंशतः खऱ्या असून भागत नाहीं, त्या पूर्णांशानें खऱ्या असाव्या लागतात. सामान्य माणसास कायदा अगर रासायनिक द्रव्यें याबद्दल कल्पना असतात, त्या तज्ञांच्या कल्पनेशीं कांहीं साम्य असल्यामुळें सामान्यपणें खऱ्या असतात, परंतु मूळ वस्तूशीं तंतोतंत धरून नसल्यामुळें अपुऱ्या असतात. वस्तूच्या वस्तुत्वाबद्दल आपल्या मनांतील सर्व कल्पनाहि अपुऱ्याच असतात. वस्तु म्हणजे गुणधर्मांचा एकत्र समूह अशी कल्पना असो, वा जिचें सार चित् अगर जड आहे अशी कल्पना असो, या दोन्हीहि अयोग्यच होत. कारण गुणधर्मांची केवळ बेरीज म्हणून वस्तू नसून ती त्यांचा आधार असते. त्याचप्रमाणें त्या आधाराचें स्वरूप अनाकलनीय असल्यामुळें तिला चित्









अनुक्रमणिका

अगर जड म्हणणेंहि अयोग्य असतें. प्रकार अगर संबंध यांच्या कल्पना मात्र योग्य असतात, कारण त्या अन्य अशा निराळ्या विषयांच्या नसून त्यांचें मूळ त्याच असतात. स्वतःहून निराळ्या अशा वस्तूंच्या निदर्शक नसून त्या स्वतःच्याच निदर्शक असतात.

### ज्ञानाची व्याख्या

लॉकनें ज्ञानाची व्याख्या केली ती अशी–" दोन कल्पनांतील संबंध– त्या एकमेकांशीं जुळणें वा विरोधी असणें– दृग्गोचर होणें म्हणजे ज्ञान होय." सत्य म्हणजे दोन कल्पना अगर त्यांचे वाचक असणारे संकेत– शब्द यांची योग्य जोडणी अगर तोडणी होय. नुसत्या एकट्या कल्पना अगर त्या कल्पनांचा मूळ वस्तूशीं संबंध, हा ज्ञानाचा विषय नसून कल्पनांचा परस्परांशीं असणारा संबंध, हाच ज्ञानाचा विषय होय. परंतु अशी व्याख्या केल्यास, ज्ञान म्हणजे मूळ वस्तूशीं संबंध नसणाऱ्या कल्पनांचा खेळ असें म्हटल्याप्रमाणें होईल व तत्वज्ञाचे गंभीर विचार व कविकल्पना सारख्याच मानाव्या लागतील. मनाला फक्त स्वतःच्या कल्पना समजतात व त्याचा प्रयत्न पदार्थाचें ज्ञान करून घेण्याचा असतो. हें शक्य असेल तर त्याला मिळणारें ज्ञान अप्रत्यक्षच असणार– तें त्यास कल्पनेच्या द्वारांच मिळणार, व कल्पना या पदार्थाला धरून आहेत, हें दाखविणारी कसोटीहि त्याच्याजवळच असली पाहिजे.

हें समजून घेण्यास्तव आपल्या कल्पनांचें थोडें अधिक परीक्षण केलें पाहिजे. एकंदर कल्पनांपैकीं बऱ्याचशा कल्पना पदार्थाच्या निदर्शक असल्याचा दावा न करणाऱ्या असतात. त्या म्हणजे मागें उल्लेखिलेल्या संमिश्र कल्पना होत. त्या साध्या कल्पनांचे मनानें केलेल्या मिश्रणांच्या असतात. यापैकीं एकच अपवाद म्हणजे वस्तुविषयक कल्पना होय.

साध्या कल्पना अगर वस्तूची कल्पना यांची स्थिति संमिश्र कल्पनेहून भिन्न असते. साध्या म्हणजे रंग, सुवास वगैरे कल्पना (म्ह. संवेदना) या कपोलकल्पित नसून त्या बाहेरील वस्तूंकडून आलेल्या असतात. त्या बाह्यवस्तूंचे नैसर्गिकपणें व नियमीतरीतीनें आपल्या इंद्रियावर झालेले परिणाम असतात. त्यामुळें त्यांची अस्तित्वांत असणाऱ्या खऱ्या वस्तूशीं सुसंगति असते. वस्तूच्या कल्पनेबाबत पाहिल्यास, तींत एवढें तरी निश्चित असतें, कीं ज्या साध्या कल्पनांचा ती समूह असते, त्या साध्या कल्पना अनुभवांतहि एकत्र दिसतात.

इंद्रियांच्या संवेदनाचेद्वारां (याना लॉक कल्पनाच म्हणतो) बाह्य जगताचें ज्ञान होतें व त्याच्या अस्तित्वाची खात्री पटते. या संवेदनांमध्यें कांहीं संवेदना पदार्थाच्या मूळ गुणधर्मांच्याच प्रातिनिधिक असतात, तर कांहीं प्रातिनिधिक नसून आपल्या ठिकाणीं पदार्थाच्या शक्तीमुळें उत्पन्न झालेल्या असतात. यावरून लॉकनें पदार्थांच्या गुणधर्मांचे मुख्य गौण असे दोन विभाग केले. चव, रंग, वास, नाद् वगैरे केवळ एकेकल्या इंद्रियास प्रतीत होणारे गुणधर्म गौण होत. ते पदार्थांत नसून आपणांतच असतात. पदार्थाचा विस्तार, गति व स्थिति, संख्या, आकृति व घनत्व हे मुख्य गुणधर्म होत. ते आपल्या पहाण्यावर अवलंबून नसून पदार्थांतच रहाणारे असतात. लॉकच्या या गौण गुणधर्मांचें –मताचें विवेचन करतांना व्हाइटहेडनें उद्गार काढले आहेत, कीं आपण निसर्गाच्या सौंदर्यास मान देतों, तो वास्तविक आपणां स्वतःस मिळावयास पाहिजे. सुगंधाकरितां गुलाबाच्या फुलास, गाण्यासाठी कोकिळेस, प्रकाशासाठीं सूर्यास मान दिला जातो. कवी या साऱ्यांना गीतें गातात, पण तें चुकीचें असतें. वास्तविक तीं गाणीं त्यांनीं स्वतःला उद्देशून गावयास पाहिजेत. त्यांनीं मानवी मनाचेंच अभिनंदन करावयास पाहिजे. कारण निसर्ग हा वास्तविक रुक्ष, नादहीन, वासहीन, रंगहीन असा जड परमाणूंच्या निरर्थक व अनंत अशा गतीनें युक्त असणारा आहे!

संवेदनांच्याद्वारें होणाऱ्या बाह्य जगाच्या ज्ञानाहून अधिक निश्चित असें ज्ञान आपल्या स्वतःच्या अस्तित्वाबद्दल प्रत्यक्ष ज्ञान व ईश्वराच्या अस्तित्वाचे पुराव्यावरून सिद्ध होणारें ज्ञान होय. आपणांस येणारी प्रत्येक कल्पना, विचार अगर सुखदुःख आपल्या स्वतःच्या अस्तित्वाची खात्री करून देतें. ईश्वराचें अस्तित्व मात्र आपल्या व जगाच्या अस्तित्वावरून व रचनेवरून अनुमानितां येतें. खरेंखुरें विश्व अस्तित्वांत आहे. जिवंत विचार करणारे प्राणी व गतिमान् जड पदार्थ यांनीं तें भरलेलें असून, त्यांत सुव्यवस्था नांदत आहे. खऱ्याखुऱ्या अस्तित्वांतील गोष्टी कांहीं नाहीं अशा अवस्थेंतून उत्पन्न होणें अशक्य आहे. असतांतून सत् उत्पन्न होऊं शकणार नाहीं. अनादि कालापासून अस्तित्वांत









असणारी कांहीं गोष्ट मानल्याशिवाय हा उगमाचा प्रश्न समाधानकारकरीतीनें सुटण्याचीहि शक्यता नाहीं. म्हणून आपण निर्माण केलेल्या प्राण्यांना दिलेल्या गुणाहून कितीतरी पटीनें गुणांनीं संपन्न अशा शाश्वत सत्तेचें अस्तित्व मान्य करावेंच लागतें. जडद्रव्य व गति यांचें, त्याचप्रमाणें सर्व शक्ति यांचें कारण म्हणून ही सत्ता सर्व शक्तिमान् असली पाहिजे. जगांतील सौंदर्य व सुव्यवस्था यांची, तसेंच विचार करणाऱ्या प्राण्यांची निर्मिती, म्हणून ती सर्वज्ञ असली पाहिजे. या गुणांचा समावेश आपण ईश्वराच्या कल्पनेंत करतों. म्हणून ती सत्ता म्हणजेच ईश्वर होय.

लॉकनें आपल्या ' मानवीबुद्धीवरील प्रबंध ' या ग्रंथांत एकंदर चार गोष्टींचा विचार केला. ( १ ) ज्ञानाचा उगम ( २ ) ज्ञानाचें स्वरूप व यथार्थतेची कसोटी ( ३ ) ज्ञानाची मर्यादा. यां पैकीं पहिल्या दोन गोष्टींची लॉकनें केलेली मीमांसा आपण पाहिली. आतां ज्ञानाची मर्यादा अगर विस्ताराचें क्षेत्र किती, याबद्दल त्याची विचारसरणी पाहूं.

लॉकच्या मतें मनुष्याच्या ज्ञानाच्या क्षेत्रापेक्षां अज्ञानाचें क्षेत्रच अधिक विस्तृत आहे. आपल्या कल्पनांचें परस्परांशी जुळणें अगर न जुळणें हें पहाणें म्हणजे ज्ञान होय, अशी ज्ञानाची व्याख्या लॉकनें केली आहे. त्यावरून ज्ञानाच्या विस्ताराची मर्यादाहि आपोआप दिसते. पहिली गोष्ट म्हणजे कल्पनेच्या पलीकडे ज्ञानाचा विस्तार नाहीं. दुसरी, कल्पनांचें परस्परांशीं जुळणें अगर न जुळणें जेवढें दृष्टिपथांत येतें, त्या पलीकडे नाहीं. तिसरें–हें दृष्टिपथांत येणें प्रत्यक्ष अथवा बुद्धीच्या अनुमानद्वारा घडतें. पण सर्व कल्पनांचें प्रत्यक्ष ज्ञान होऊं शकत नाहीं. चौथें–त्याच प्रमाणें बुद्धिद्वारां अनुमानाचें क्षेत्र सुद्धां सर्व कल्पनाइतकें नसतें.

पांचवें–संवेदनेच्या द्वारें होणाऱ्या ज्ञानाचें क्षेत्र तर वरील दोन्ही ज्ञानाच्या क्षेत्राहून संकुचित असतें.

सहावें–कल्पनांहून ज्ञानाचें क्षेत्र संकुचित असतें. कारण सर्वच कल्पना संशयरहित अगर स्पष्ट नसतात. याप्रमाणें ज्ञानाचें क्षेत्र मर्यादित असलें, तरी मनुष्यानें आपले स्वतःचे पूर्वग्रह, वैयक्तिक स्वार्थ बाजूस ठेवून अत्यंत परिश्रमपूर्वक खोट्या कल्पना बाजूस सारून सत्य संशोधनाचा अट्टाहास केल्यास हें क्षेत्र हळू हळू वाढूं शकेल.

ही ज्ञानमीमांसा कागदाच्या एका पानावर लिहून काढूं, अशी लॉकची प्रथम कल्पना होती. पण पुढें वीसवर्षांच्या चिंतनांत पांचसहाशे पानांचा ग्रंथ तयार झाला ! त्याच्या अनेक आवृत्त्या निघाल्या. तो लोकप्रिय होऊन तत्वज्ञानावरील सर्व पुस्तकांपेक्षां त्याला अधिक वाचक मिळाले. फील्डींग सारख्या केवळ लोकरंजनार्थ लिहिणाऱ्या लेखकानें आपल्या कादंबरींत लॉकच्या विशिष्ट मतांचीं अवतरणें मूळ शब्दांतच दिलीं आहेत. लॉकची लेखनशैली आकर्षक होती असें नव्हे, तर प्रत्येक प्रश्नाचा विचार प्रामाणिकपणें व कळकळीनें करणें, हें त्याचें वैशिष्ट्य होतें. त्याच्या बुद्धीची धार तीक्ष्ण होती असें नव्हे, किंवा विचारधाराहि सूक्ष्मतर्कपद्धतीनेंच वहात होती असेंहि नाहीं, परंतु त्याच्या मर्यादेमुळेंच त्याचें लेखन अधिक परिणामकारक व अधिक लाघवी झालें, असें ब्रॉड सारख्या चोखंदळ लेखकानें म्हटलें आहे. ह्यूमबद्दल तो वाजवीपेक्षां हुशार आहे, अशी शंका येते. ह्यूमनेंच म्हटल्याप्रमाणें वार्क्लेच्या मताचें खंडन करणें दुरापास्त, पण त्याबद्दल खात्रीहि होणें दुरापास्तच. हॉब्स वाचतांना विवेकबुद्धीपेक्षां कोट्या व खोडकरपणाचाच वरचढपणा प्रतीत होतो. पण लॉक वाचतांना वाटतें, कीं यांच्या मनांत आलें, तरी सुद्धा शब्दाची कसरत करून आपणांस फसविण्याची ताकद असण्याइतका हा हुशार नाहीं. लॉकनंतर होऊन गेलेल्या जवळजवळ साऱ्या तत्वज्ञांनीं त्याच्यांवर टीका करून त्याचे दोष दाखविले आहेत. ज्ञानमीमांसा करितांना त्यानें मानसशास्त्रीय विवेचन व तार्किक पृथक्करण यांची मिसळ केली आहे. त्यानें वापरलेली परिभाषाहि भोंगळ आहे. इंद्रियानुभववादाची भूमिकाहि तंतोतंत त्यानें पाळली नाहीं. परंतु हें सर्व गृहीत धरूनसुद्धां त्याच्या कामगिरीचें मूल्य थोर आहे. त्यानें ज्ञानविषयक मूलभूत प्रश्न उपस्थित केले, तत्वचिंतनास नव्या तऱ्हेची चालना दिली व त्याच्या प्रगतीस या दृष्टीनें मोठा हातभार लावला. अंधश्रद्धा व अधिकारवाद न मानणें, स्वतंत्र व मोकळ्या मनानें विचार करणें, तत्वज्ञानांतील सूक्ष्म प्रश्न उपस्थित करणें व ते साध्यासुध्या भाषेंत व्यक्त करणें, ही त्याची कामगिरी म्हणजे आधुनिक पाश्चात्य तत्वज्ञानाच्या इतिहासांतील एक अत्यंत महत्वाचा टप्पा म्हणूनच लेखिली पाहिजे.

---



अनुक्रमणिका






थिओडोर ड्रेपर अनु. अशोक शहाणे

# कॅस्ट्रो आणि क्यूबांतील विश्वासघातकी क्रांति : ३ :

## चोराला सोडून संन्याशाला – सुळीं देणारा इतिहास

कांहीं लेखकांना कॅस्ट्रोमध्यें एक कम्युनिझम सोडून बाकी सर्व कांहीं दिसत आहे, उलटपक्षीं कांहींना त्याच्यांत कम्युनिझमखेरीज दुसरें कांहींच दिसत नाहीं. ह्या दुसऱ्या विचारसरणीचें आत्यंतिक रूप श्री. नॅथॅनिअल वील यांच्या Red Star Over Cuba ह्या ग्रंथांत आढळून येतें. विसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकांत श्री. वील यांना आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीच्या अंतरंगाचें स्वरूप कळलें. अल्जर हिस अमेरिकेंतील कम्युनिस्ट पक्षाच्या ज्या गटांत होता, त्याच पक्षांत आपणहि होतों असा दाखला एकदां श्री. वील यांनीं दिला होता. मेक्सिकोचे माजी अध्यक्ष श्री. लॅझॅरो कार्डेनास यांच्या कारकिर्दीत घडून आलेल्या शेतकी सुधारणांवर एक ग्रंथहि पण त्यांनीं लिहिला आहे. परंतु गेल्या दोन वर्षांच्या काळांत किंवा अन्य कोणत्याहि काळीं त्यांना क्यूबांतील परिस्थितीची चक्षुर्वै माहिती असल्याच्या खुणा कोठेंच आढळत नाहींत.

वील यांचा ग्रंथ बऱ्याचशा प्रमाणांत बॅटिस्टांच्या राजवटींतील कम्युनिस्ट हालचालींना दडपणाऱ्या सरकारी खात्याच्या अहवालांवर आधारलेला आहे. न्यूयॉर्कमधील सनसनाटी वृत्तपत्रांतील रंगीबेरंगी लेखमाला म्हणजे जणुं गंभीर इतिहास–संशोधनाकरितां उत्कृष्ट मालमसाला आहे, अशी वृत्ति ह्या पुस्तकांत आहे. हातीं असलेली माहिती वापरण्यांत–ही माहिती बरी, वाईट व संशयास्पद अशी आहे–श्री. वील जी बेपर्वाई दाखवितात, तिला तोड फक्त त्यांच्या मतांतच सांपडेल. १९४८ सालापासून म्हणजे वयाच्या २१ व्या वर्षापासून फिडेल कॅस्ट्रो हा ' विश्वासू रशियन दलाल ' होता, येथपासून ते क्यूबा कम्युनिझमला बळी पडला याचें कारण म्हणजे अमेरिकेच्या परराष्ट्र-खात्यांतील अधिकारी ' लांचखोर ' होते–येथपर्यंत वील साहेबांची भरारी आहे. पुस्तकांतील मूळ मुद्दा श्री. जेम्स इस्टलंड व श्री. थॉमस डॉड या सीनेटच्या अंतर्गत सुरक्षा समितीच्या सभासदांनीं आपल्या भाषणांत सांगितलेला होता. वीलनीं तो अंश उद्धृत केला आहे : " चीन ज्याप्रमाणें कम्युनिस्टांच्या हवालीं करण्यांत आला, त्याचप्रमाणें अमेरिकनांच्या एका गटानें क्यूबाहि कॅस्ट्रोच्या व कम्युनिस्टांच्या हवालीं करण्यांत आला आहे. " परिणामीं ' कॅस्ट्रो व त्याला सत्तास्थान बहाल करणारे लोक यांच्या विरुद्ध कडव्या उजव्या फळीनें उभारलेली ही ' केस ' आहे.

श्री. वील यांनीं अवलंबिलेली विचारांची मांडणी ही आहे, कीं त्यावर विश्वास ठेवणें दुरापास्तच. बारा वर्षांपूर्वीपासूनच कॅस्ट्रो हा कम्युनिस्ट व सोव्हिएट रशियाचा हस्तकहि होता, हा पुरावा परराष्ट्रखात्याच्या कांहीं सदस्यांनीं स्वीकारला नाहीं, म्हणून श्री. वील त्यांच्यावर सारखें तोंड टाकतात. परंतु अमेरिकेच्या Central Intelligence Agency चे डेप्युटी डायरेक्टर असलेले जनरल सी. पी. कॅबेल यांनीं सीनेच्या अंतर्गत सुरक्षितता उपसमितीला सादर केलेल्या निवेदनांत " कस्त्रो हा कम्युनिस्ट आहे वा तो स्वतःला कम्युनिस्ट समजतो, असें आम्हांला वाटत नाहीं " असें म्हटलें होतें, याचा उल्लेख करण्याचेंहि श्री. वील कोणत्याहि कारणानें का होईना–टाळतात. ( आणि तरी सीनेटची ही उपसमिति म्हणजे वीलसाहेबांची आवडती संस्था आहे. ) कॅस्ट्रोच्या भूतकालीन राजकीय संबंधांचा शोध घेण्याकरितां CIA नें बहुतेक थोडेफार तरी श्रम घेतले असतीलच, फक्त ' appeasement–minded subordinates ' बद्दल परराष्ट्र खातें जितकें गोंधळांत पडलें होतें. तितका गोंधळ CIA नें केला नाहीं. ( Appeasement–minded Subordinates) हा शब्दप्रयोग श्री. वील









यांचाच. त्या काळीं उपसचिव असलेले श्री. ख्रिश्चन हर्टर, लॅटिन अमेरिकन खात्याचे सहसचिव श्री. रॉय आर. रबॉटम आणि कॅरिबिअन विभागाचे डायरेक्टर श्री. विल्यम ए. वीलंड यांच्या संदर्भांत ते हा शब्दप्रयोग योजितात. CIA कदाचित् चुकलीहि असेल, परंतु पर-राष्ट्र खात्यांतील त्याच मताच्या सभासदांविरुद्ध श्री. वील जो ओरडा करतात त्याची किंमत तरी CIA नें ह्या पुराव्याच्या केलेल्या चोळवणीवरून लक्षांत यावें.

मात्र शेवटपर्यंत बॅटिस्टांच्या बाजूनें लढलेले कॅस्त्रोचे पूर्वीचे मेहुणे श्री. राफेल डायझ बॅलार्ट यांनीं सीनेटच्या अंतर्गत सुरक्षा उपसमितीसमोर दिलेल्या साक्षीचा उल्लेख श्री. वील करतात. बॅटिस्टांचे माजी पंतप्रधान डॉ. एमिलिओ न्युनेझ पोर्टुऑंडो यांच्या साक्षीशीं 'मूलतः जुळणारी' अशी साक्ष श्री. डायझ बॅलार्ट यांनीं दिली, असें ते म्हणतात ('१९४५-४६ सालीं, विद्यापीठांत प्रवेश केल्याच्या पहिल्याच वर्षांत कम्युनिस्ट पक्षाच्या शिस्तीचें जूं कॅस्त्रोनें स्वीकारलें व फिडेलिओ हें आपल्या पक्षाचें नांव वापरांत आणलें' अशी साक्ष डॉ. न्युनेझ पोर्टु-ऑंडो यांनीं दिली होती.) नंतर श्री. डायझ बॅलार्ट यांच्या साक्षींतील कॅस्त्रो व कम्युनिस्ट विद्यार्थी यांमध्यें एकमेकास मदत करण्याबाबत चांगलीच समज' होती असें सूचित करणाऱ्या उद्धृतीच तेवढ्या श्री. वील यांनीं उचलल्या आहेत. परंतु श्री. डायझ बॅलार्ट यांनीं ठामपणें केलेलें पुढील विधान मात्र त्यांनीं उद्धृत करण्याचें टाळलें आहे; तें विधान असें– "नाहीं, त्यावेळीं तरी तो सभासद नव्हता. त्यावेळीं तो वर येण्याची इच्छा असलेला एक संधिसाधु पुढारी होता." डायझ बॅलार्ट यांची साक्ष मूलतः आणखी कशीहि असो, ती डॉ. न्युनेझ पोर्टुऑंडो यांच्या साक्षीशीं जुळणारी नव्हती खास.

सिएरा मेस्त्रा येथें कम्युनिस्टांनीं कांहीं रक्कम कॅस्त्रोच्या स्वाधीन केली म्हणें, त्याबाबतहि श्री. वील अशींच भरमसाट विधानें करतात. न्यूयॉर्कच्या Daily Times मध्यें दोन वार्ताहरांनीं केलेल्या लिखाणांतून श्री. वील कांहीं उतारे घेतात: "कॅस्त्रोच्या खास गोटांतील एक इसम म्हणाला, कीं 'एकदां कार्लोस राफेल रॉड्रीग नांवाचा क्यूबांतील कम्युनिस्ट पक्षाचा प्रमुख कार्यकर्ता खूप पैसे जवळ असलेल्या बारा माण-सांना घेऊन आला. त्यांच्याजवळ आठ लक्ष डॉलर होते. ह्या कार्यकर्त्याला आलिंगन देऊन कॅस्त्रो ओरडला, 'आतां युद्ध जिंकायची आपली तयारी आहे.'" अशाप्रकारें 'कॅस्त्रोच्या खास गोटांतील माणसाचें म्हणणें' उद्धृत करणाऱ्या दोन वार्ता-हरांच्या लिखाणांतून श्री. वील उद्धृत करतात. परंतु यानंतर तीसएक पानें गेल्यानंतर वीलसाहेब म्हणतात: "आतां कार्लोस राफेल रॉड्रीग हा क्यूबन कम्युनिस्ट पक्षाच्या राजकीय समितीचा निव्वळ सभासदच नव्हे तर तेथील सूत्रें हलविणारा एक इसम सिएरा मेस्त्रा येथें गेला व त्यानें फिडेल कॅस्त्रोकरितां जवळजवळ दहा लाख डॉलर दिले हें आपण पाहिलें." राफेल रॉड्रीग १९५८ च्या जूनमध्यें सिएरा मेस्त्रा येथें गेला हें निर्विवाद—गेल्या वसंतऋतूंत मी जेव्हां त्याला भेटलों, तेव्हां त्यानें हें विनायास कबूल केलें— पण अत्यंत तोकडी स्मरणशक्ति असलेल्या वाचकानेंच फक्त त्यानें कॅस्त्रोकरितां जवळजवळ दहा लाख डॉलर दिल्याचें 'पाहिलें' असेल. कदाचित् दहा लाख डॉलर त्यानें कस्त्रोकरितां आणलेहि असतील, नाहीं असें नाहीं; त्याबद्दलचा जो पुरावा आपल्याजवळ आहे, तो अगदींच लेचापेचा आहे, सांगोवांगीचा आहे. परंतु तरीसुद्धां वीलसाहेब आपले ठामपणें सांगतच रहातात, कीं 'फिडेल कॅस्त्रोच्या सैन्याला विजय मिळाला, याचें प्रमुख कारण असें, कीं त्यांच्यापाशीं जवळजवळ अगणित संपत्ति होती.'

श्री. वील दाखवूं पाहतात त्यापेक्षां क्यूबांतील राज-कीय परिस्थिति किती अधिक गुंतागुंतीची असूं शकेल, याची कल्पना त्यांनीं केलेल्या श्री. रोल रोआ यांच्या उल्लेखावरून येऊं शकेल. वीलसाहेब म्हणतात, "श्री. रोल रोआ हे क्यूबन कम्युनिस्ट पक्षाचे आरंभापासूनचे एक नेते व कार्यकारिणीचे सभासद होते. यांनाच फिडेल कॅस्त्रो पुढें परराष्ट्र मंत्री करणार होता." बस्, एवढेंच. यावरून वाचकांचा असा समज होईल, कीं श्री. रोआ हे कॅस्त्रोच्या गोतावळ्यांतील अनेक कम्युनिस्ट कार्यकर्त्यांप्रमाणें एक होते. परंतु श्री. रोआ यांचें राजकीय जीवन यापेक्षां कितीतरी पटींनीं अधिक वैविध्यपूर्ण होतें. १९५६ सालीं मेक्सिकोंत






-असतांना रशियन 'आक्रमकांनीं' हंगेरींत केलेल्या 'गुन्ह्यांचा, अत्याचारांचा व दडपशाहीचा' त्यांनीं निषेध केला होता. हा लेख व कम्युनिझमला पोषक नसलेले त्यांचे इतर लेख एकत्रित स्वरूपांत क्यूबन सरकारी प्रकाशन संस्थेनें प्रकाशित केलेल्या त्यांच्या En Pie या ग्रंथांत पुनर्मुद्रित करण्यांत आले होते. ब्लास रोका या कम्युनिस्ट नेत्यानें Hoy या अधिकृत कम्युनिस्ट मुखपत्राच्या ११ मार्च १९५९ च्या अंकांत श्री. रोआ यांना Plattista असें म्हटलें आहे. Plattista म्हणजे 'अमेरिकन साम्राज्य-वादाचा हस्तक' या शिवीला समानार्थी क्यूबन शब्द. परंतु तरी श्री. रोआ हे आतां त्यांनींच पूर्वी टीका केलेल्या कम्युनिझमचे व रशियाचे आज्ञाधारक प्रवक्ते बनले आहेत. कम्युनिस्टांचा विश्वास मात्र त्यांना संपूर्णपणें कधींच संपादन करतां आला नाहीं, व एका कम्युनिस्टालाच त्यांच्या हाताखालीं उपसचीव म्हणून नेमण्यांत आलें आहे.

बॅटिस्टांच्या दप्तरीच्या माहितीवरून श्री. फॉस्टिनो पेरेझ यांनाहि श्री. वील कम्युनिस्ट बनवतात. आप-ल्याशीं समझोता करण्याचें नाकारलें व त्यामुळें एप्रिल १९५८चा संप अयशस्वी झाला, याचें खापर कम्यु-निस्ट लोक नेहमींच श्री. पेरेझ यांच्यावर फोडत आले आहेत ( पेरेझ पूर्वी हवानांतील भूमिगतांचे नेते होते ). मेजर हबर्ट मॅटॉस यांना वाईट वागणूक दिल्याबद्दल तक्रार केली म्हणून नोव्हेंबर १९५९ मध्यें जेव्हां त्यांना कॅस्ट्रोच्या मंत्रीमंडळांतून हांकलून देण्यांत आलें, तेव्हां कम्युनिस्टांनीं त्यांच्यावर सूड उगवला. '१९५७ सालापासूनच' श्री. मॅटॉस कम्युनिस्टांचें कार्य करीत होते, अशी एक 'क्यूबन भूमिगत' बातमी म्हणून श्री. वील ठेवून देतात. आपल्या कम्युनिस्ट-विरो-धाची किती जबरी किंमत श्री. मॅटॉस यांनीं दिली आहे, याचा उल्लेखहि ते करीत नाहींत. बॅटिस्टा व ट्रुजिलो यांच्या दप्तरची माहिती आंधळेपणानें प्रमाण मानणाऱ्या पुस्तकांत अशा घोडचुका असणें अटळ आहे. कम्युनिस्ट, भूतपूर्व कम्युनिस्ट, कम्युनिस्ट नसलेले, व निव्वळ संधि-साधू या सर्वांची येथें एकच मोट बांधण्यांत आली आहे. ग्रंथाच्या प्रतिपादनाशीं न जुळणारा पुराव्याचा प्रत्येक कपटा बेधडक दडपून टाकला आहे, किंवा त्याचा फक्त उडत-उडत उल्लेख केला आहे. कॅस्ट्रोच्या राजकीय विकासाच्या बिकट समस्या अति-सोप्या केल्या आहेत, त्यांचा सस्ता बाजार मांडला आहे.

प्रा. मिल्स व श्री. वील या दोघांचींहि पुस्तकें वाचणारा वाचक कधीं कधीं भयंकर बुचकळ्यांत पड-ण्याचा संभव आहे. 'यांकी सरकार बॅटिस्टाला एक-सारखं पाठवत असलेल्या शस्त्रास्त्रांचं तूं काय केलंस ?' —अशा प्रश्नाचा टोमणा प्रा. मिल्सच्या यांकीला मारला जातो. परंतु श्री. वील यांच्या पुस्तकांत बॅटि-स्टांना शस्त्रास्त्रें न पाठविण्याच्या मार्च १९५८ मध्यें अमेरिकेनें निर्णयाविषयीं क्यूबांतील माजी अमेरिकन वकील असें म्हणतात, कीं 'सरकारच्या नीतिमत्तेवर होणारा परिणाम बऱ्यांपैकीं नव्हता.' Respuesta ( उत्तर ) या अलीकडेच मेक्सिकोंत प्रकाशित झालेल्या पुस्तकांत बॅटिस्टांनींहि अशीच कडवी तक्रार केली आहे, कीं शस्त्रास्त्रें पाठविणें थांबविल्याचे परिणाम भयंकर होते. शस्त्रास्त्रांचा पुरवठा करण्याचें बंद केलें होतें, ही गोष्ट प्रा. मिल्सच्या पुस्तकाच्या वाचकाला कधींच माहित होणार नाहीं. आणि शस्त्रास्त्र-पुरवठा बंद केल्याचा परिणाम military mission मागें न घेतल्यानें अंशतः तरी निरुपयोगी ठरला, ही गोष्ट श्री. वील यांच्या पुस्तकाच्या वाचकास कधींच माहित होणार नाहीं.

New York Times चे श्री. हर्बर्ट एल. मॅथ्यूज हे श्री. वीलच्या सूळावरचे प्रमुख संन्यासी. १९५७ च्या फेब्रुवारी महिन्यांत श्री. मॅथ्यूज यांनीं तीन लेख लिहिले व कांहीं छायाचित्रें प्रसिद्ध केलीं. त्यावरून असें सिद्ध झालें, कीं कॅस्ट्रो अजून जिवंत आहे; व श्री. मॅथ्यूज यांनीं कॅस्ट्रोच्या ध्येयवादाविषयीं, त्याच्या धैर्याविषयीं व त्याच्या कम्युनिस्टांपासून अलिप्त असण्याविषयीं हमी घेतली. अमेरिकेचे वकील म्हणून क्यूबांत जाण्यापूर्वी श्री. मॅथ्यूज यांचा सल्ला घ्यावा असा उपदेश श्री. विल्यम वीलंड यांनीं श्री. मॅथ्यूज यांना केला, हा श्री. वील यांचा वीलंडवरील प्रमुख आरोप दिसतो. "कॅस्ट्रोच्या चळवळींत संघटित स्वरूपाचा कोणताहि कम्युनिस्ट अंश नव्हता. किंवा खुद्द कॅस्ट्रोवर कम्युनिस्टांचा प्रभाव होता, असें दाखविणारा कांहींएक पुरावा नाहीं" असें श्री. स्वॅटम








यांनीं बटिस्टांनीं प्रयाण करण्यापूर्वी फक्त एकच दिवस –म्हणजे ३१ डिसेंबर १९५८ रोजीं – सीनेटच्या उपसमितीसमोर सांगावें, हाच श्री. वील यांचा श्री. रबॉटम यांच्यावरील प्रमुख आरोप दिसतो. आणि श्री. रबॉटम यांची उगाच एवढी नालस्ती केली, ती पुरी न पडल्यानेंच जणुं श्री. वील आणखी असाहि आरोप करतात, कीं श्री. रबॉटम हे डॉ. मिल्टन आयसेनहॉअरांचे पाळीव बच्चे होते आणि "एक सदिच्छा असलेले, सर्वसामान्यतः डाव्या फळींतील New Deal काळांतील जुने नोकरदार" म्हणून डॉ. आयसेनहॉअर यांना उडवून लावतात.

श्री. स्मिथ यांना श्री. मॅथ्यूज यांनीं दिलेल्या माहितीमुळें अमेरिकन राजकारणांतील कांहीं गटांत किंचित्शी खळबळ माजण्याचीं चिन्हें दिसतात. ही माहिती मात्र श्री. वील यांच्या पुस्तकांत सुयोग्य रीतीनें दिलेली आहे. नंतर तपासून पहातां श्री. स्मिथ यांच्या साक्षींत असें उद्‌गार आढळून आले : 'सहा आठवडे मी वॉशिंग्टनमध्यें होतों. दर आठवड्याचे चार दिवस मी तेथें असे. ह्या वास्तव्यांत कित्येक संस्थांना भेटी देणें आणि परराष्ट्र-खात्याकडून व परराष्ट्र-खात्यानें सुचविलेल्या व्यक्तींकडून माहिती मिळविणें, हीं कामें मीं उरकलीं. या अनेक लोकांतच श्री. वीलंड यांनीं श्री. मॅथ्यूज यांचें नांव सुचविलें. श्री. स्मिथ यांची ही साक्ष वीलसाहेब मनाजोगती बदलून घेतात : "आणि राष्ट्रदूत श्री. स्मिथ एक महत्त्वाची गोष्ट प्रकाशांत आणली. ती अशी, कीं हवानाला प्रयाण करण्यापूर्वी क्यूबन राजकारणाविषयीं माहिती मिळविण्यासाठीं श्री. वीलंड यांनीं श्री. स्मिथ यांना श्री. हर्बर्ट मॅथ्यूज या एकाच व्यक्तीकडे पाठविलें." यावरून असें वाटावें, कीं श्री. स्मिथ यांना माहिती देणारा मॅथ्यूज हा एकटाच इसम होता. आणि १९५७ च्या मार्च महिन्यांत श्री. स्मिथ यांना श्री. मॅथ्यूज यांचें नांव सुचविण्यांत आलें यांत महत्त्वपूर्ण काय आहे, हें आकलन होणें दुरापास्त आहे; कारण त्यावेळीं कॅस्त्रोशीं बोललेल्या थोडक्या अमेरिकन नागरिकांत श्री. मॅथ्यूज हे एक होते.

श्री. वील यांनीं न उल्लेखिलेली सीनेटच्या अंतर्गत सुरक्षा उपसमितीसमोरील एक साक्ष अप्रासंगिक ठरली नसती. कर्नल युगाल्ड कॅरिलो या सिएरा मेस्त्रा विभागांतील बॅटिस्टांच्या सेनाधिकाऱ्याच्या विधानाप्रमाणें त्याचें तेथील सैन्य सहा ते सात हजार होतें. कॅस्त्रोच्या सैन्याचा त्याचा अंदाज सात-आठशे असा आहे. शिवाय बॅटिस्टांच्या सैन्यांतील तेहतीस हजारांपेक्षां अधिक सैनिक इतरत्र होतेच. चाळीस हजारावर सैनिक असलेलें हें सैन्य कित्येक वर्षांपासून अमेरिकेकडून व इतर राष्ट्रांकडून हवीं तितकीं शस्त्रास्त्रें मिळवीत होतें. १९५३ ते ५७ सालच्या मध्यापर्यंतच्या काळांत क्यूबांत अमेरिकेचे राष्ट्रदूत असलेले श्री. आर्थर गार्डनर इतके बॅटिस्टांच्या बाजूचे होते, कीं श्रीमती रुबी हार्ट फिलिप्स ह्या कित्येक वर्षे हवानांत न्यूयॉर्क Times च्या वार्ताहराचें काम करणाऱ्या महिलेनें आपल्या अलीकडेच प्रकाशित झालेल्या पुस्तकांत लिहिल्याप्रमाणें, हे अभिनय करीत आहेत असें वाटून बॅटिस्टा गोंधळून जात. आणि श्री. मॅथ्यूज यांनीं उल्लेखनीय माहिती पुरवूनहि श्री. गार्डनर यांचे वारसदार, अर्ल स्मिथ, हे इतके 'कॅस्त्रो–विरोधी' वृत्तीचे होते, कीं त्यांच्याखालील लोकांनीं त्यांना किंचित् कमी पक्षपाती भूमिका घेण्याच्या व्यर्थ विनविण्या केल्या. आणि १९५७ च्या फेब्रुवारींतील श्री. मॅथ्यूज यांच्या तीन लेखानंतरहि चौदा महिन्यांनीं कॅस्त्रोच्या सैनिकांचा आंकडा ( प्रा. मिल्सचा मतें ) अवघा तीनशेच किंवा जास्तींत जास्त म्हणजे ( श्री. युगाल्ड यांच्या मतें ) आठशेंच होता.

श्री. बॅटिस्टा यांच्याजवळील सैन्य संख्येनें व शस्त्रास्त्रांनींहि शेवटपर्यंत इतकें वरचढ होतें, कीं बॅटिस्टांच्या पदच्युतीला एक केवळ जनतेची क्रांतीच कारणीभूत ठरूं शकेल. कॅस्त्रोची हवानावरील चढाई बॅटिस्टांचें सैन्य यशस्वीरीत्या थोपवूं शकलें असतें काय, या प्रश्नाला बॅटिस्टांच्या सैन्याचे सर्वाधिकारी, जनरल फ्रान्सिस्को टॅबर्निला, यांनीं दिलेलें उत्तर सत्यस्थितीला खूपच जवळ येतें. "तसें करतां आलें असतें; परंतु तरी अधिक काळ तग धरतां आली नसती. कारण तोंपर्यंत क्यूबांतील जनता बॅटिस्टांना विरोधी झाली होती आणि एकदां जनताच शस्त्रें हातांत घेऊन उभी राहिली, तर तिला दडपून टाकूं शकणारें सैन्य जगांत कोठेंच अस्तित्वांत नाहीं."

स्टॅटफर्ड विद्यापीठानें २९ ऑगस्ट १९६० रोजीं प्रसिद्ध केलेल्या Hispanic American Report



अनुक्रमणिका






मध्यें श्री. हर्बर्ट मॅथ्यूज यांनीं या समस्येवरील आपले अलिकडील विचार मांडले आहेत. "कॅस्त्रोची राजवट ही एक स्वातंत्र्य नसलेली, संपूर्णपणें एकाच माणसाच्या कह्यांत असलेली हुकुमशाही" ठरावी याबद्दल श्री. मॅथ्यूज यांना उघड उघड धक्का बसलेला आहे. बरोबरच आहे. ते असें म्हणतात, कीं 'कितीहि भक्कम साम्य असलें, तरी परंतु तो मार्क्सवाद, कम्युनिझम किंवा फॅसिझम नव्हे. तरी एकंदरीनें पाहतां एका वेगळयाच स्वरूपाची सर्वंकष अशी उभारणी होत आहे. परंतु श्री. मॅथ्यूज हा मजकूर लिहित असतांनाच, क्यूबन क्रांतीचें वैशिष्टय म्हणजे ती 'मार्क्सवादी' असल्याचें श्री. ग्वव्हॅरा सुचवित होते. कम्युनिस्ट लोकांना सहाय्य करणाऱ्या व त्यांना खूष ठेवण्याच्या कॅस्त्रोच्या धोरणास श्री. मॅथ्यूज विरोधच करीत राहतात. "ज्या २६ जुलै आंदोलनानें क्रांतीची सुरवात केली व तिला यश संसादन करून दिलें, तें आंदोलन हवेंत विरूं देऊन कॅस्त्रो आरंभापासूनच न कळत कम्युनिस्टांच्या आहारीं गेला. त्यामुळें निर्माण झालेल्या पोकळींत कम्युनिस्टांनीं स्वाभाविकपणेंच स्वतःचा शिरकाव करून घेतला."–असें श्री. मॅथ्यूज यांनीं उघडपणें लिहून ठेवलें आहे. परंतु, यांतील **न कळत** हें खरें काय? वास्तविक पहातां हा निर्णय जाणून बुजूनच घेतला होता–तशी कबूलीहि दिली गेली आहे. चंडखोरांचें सैन्य हवेंत विरूं 'देण्याचा' अलीकडचा निर्णय जितका कळून सवरून घेण्यांत आला होता, तेवढाच हाहि निर्णय बुद्धयांच घेण्यांत आला होता. कॅस्त्रोच्या कांहीं लंगड्या समर्थकांप्रमाणें कम्युनिस्टांच्या प्रभावाची शक्यता मात्र श्री. मॅथ्यूज उडवून लावत नाहींत. उलट ही शक्यता संभाव्यतेंत रूपांतर होण्याचीं लक्षणें त्याला इतकीं स्पष्ट दिसतात, कीं 'मागें फिरतां येणार नाहीं अशी परिस्थिति लौकरच येईलसें वाटतें' असं ते म्हणतात. परंतु प्रमुख जबाबदारीच्या ओझ्यांतून कॅस्त्रोला सोडविण्याची काळजी त्यांना लागून राहिल्यामुळें ते कधींकधीं अशीं विधानें करतात कीं कॅस्त्रोचें कम्युनिस्टधार्जिणें धोरण सुसंगतच होतें, तर कधीं असें म्हणतात कीं कॅस्त्रोच्या हातून ही चूक घडली, तर आणखी कधीं असेंहि लिहून जातात कीं कॅस्त्रो यांत ढकलला गेला. सारांश, श्री. मॅथ्यूज यांच्या मनांत कॅस्त्रोबद्दल असलेली श्रद्धा क्षीण झाली असली, तरी ती अद्याप निष्प्राण झालेली नाहीं. आणि अजूनहि ते असें लिहूं शकतात, कीं 'हें चमत्कारिक वाटेल, परंतु कॅस्त्रोच्या जीवास अपाय होऊं नये अशी प्रार्थना अमेरिकनांनीं केली पाहिजे. परिस्थिति सुधारण्याच्या सर्व आशा केवळ कॅस्त्रोंतच एकवटल्या आहेत.'

### क्रांति कोणाची?

एका मुद्यावर प्रा. मिल्स, श्री. जॉनसन व श्री. वील हे तिघेहि जवळजवळ सहमत आहेत. प्रा. मिल्सच्या मतें कॅस्त्रोची राजवट ही 'शेतकरी–कामकऱ्यांची क्रांतिकारक हुकूमशाही' आहे. श्री. जॉनसन यांना वाटतें, ती 'जनतेची अस्सल हुकूमशाही' आहे. आणि. श्री. वील म्हणतात, ती 'जनतेची हुकूमशाही' आहे. आजच्या क्यूबाच्या संदर्भांत या नेहमीं गैरवापर होणाऱ्या व स्पष्ट व्याख्या केल्या न गेलेल्या शब्दांना काय अर्थ असूं शकेल?

गेल्या वसंतांत मी क्यूबांत गेलों असतांना तेथील मंत्रीमंडळांत क्यूबाच्या बड्या नेत्यांचा एक नमुना पहावयास मिळाला. आठ वकील, तीन माजी विद्यार्थी, दोन प्राध्यापक, एक वास्तुशिल्पकार, एक स्थापत्यतंत्रज्ञ आणि अशाच प्रकारचे आणखी लोक त्यांच्या पैकीं बहुसंख्य अद्याप पूर्वीच्याच जागांवर आहत किंवा त्यांच्या जागीं आलेले नवे लोकसुद्धां त्याच एकाच प्रकारचे आहेत. प्रत्येकानेंच विद्यापीठीय शिक्षण घेतलेलें आहे (कांहींनीं तर अमेरिकेंत), हे लोक उच्च वा मध्यमवर्गांतील आहेत, आणि प्रत्येकजण कांहीं व्यवसायांत शिरला वा बुद्धिजीवि झाला– अगर त्यांना तसें होण्याची महत्त्वाकांक्षा होती. आपल्याला आकलन होईल अशा अर्थानें त्यांच्यापैकीं एकहि जण शेतकऱ्यांचा वा सामान्य जनतेचा प्रतिनिधि नाहीं किंवा आजचें त्यांचें स्थान हें कोणत्याच संघटित शक्तीमुळें वा दबावामुळें त्यांना लाभलेलें नाहीं. आज ते त्या स्थानावर आहेत, तें केवळ कॅस्त्रोच्या मर्जीमुळें; व ते एकट्या कॅस्त्रोलाच जबाबदार आहेत. हें प्रा. मिल्सना मान्य आहे. आजच्या क्यूबांत कॅस्त्रोच्या हातीं प्रत्यक्षांत 'अनिर्बंध सत्ता' आहे, असें ते आडपडदा न ठेवतां सांगून टाकतात ! पण मग त्यामुळें 'शेतकरी–कामकऱ्यांच्या हुकूमशाही'ची काय गत होते !








१९६० सालच्या वसंतांत श्री. हबरमन व स्वीझी यांना क्यूबांत जी परिस्थिति आढळून आली, तिचें निरूपण करतांना त्या यशस्वी क्रांतींत त्यांनीं शेतकरी-वर्गाला निर्णायक भूमिका दिली, कॅस्त्रोला 'क्रांतीची इच्छा व शेतकरीवर्गाच्या शक्तीची मूर्ति' बनवलें, आणि 'जगांतील कदाचित् एकमेव अत्यंत क्रांतिकारक वर्ग' व 'आजच्या जगांतील कोणत्याहि वर्गाइतका वैशिष्ट्यपूर्ण' अशीं प्रशस्तिपत्रें क्यूबाच्या शेतकरी-वर्गाला बहाल केलीं. नंतर सहा महिन्यांनीं त्यांनीं परत क्यूबाला भेट दिली; तेव्हां त्यांना असें आढळून आलें 'कमाल क्रांतिकारक वर्ग हे शेतकरीवर्गाचें बिरुद कामगारवर्गानें पटकाविलें आहे, व शेतकऱ्यांचा भरणा असलेल्या व शेतकऱ्यांकडूनच पोसलें जात अस-लेल्या बंडखोरीच्या सैन्यास आंशिक ग्रहण लागलेलें आहे. वसंत ऋतूंत ते आनंदले होते, आतां हिवा-ळ्यांत ते मुग्धच झाले. शेतकऱ्यांची क्रांति अद्‌भुत होती आणि क्रांतीच्या यशांतून शेतकऱ्यांना घाईनें वगळलें, हें तर शतपटीनें अद्‌भुत होतें. परंतु शेतकरीवर्ग हा 'जगांतील कोणत्याहि वर्गाइतका वैशिष्ट्यपूर्ण' होता, तर त्याला असें वगळण्यांत कां यावें, याचा खुलासा ते कोठेंच करीत नाहींत. वास्तविक जो वर्ग Lider Maximo नें मूर्त केलेली क्रांति करून उठला, आणि जो आजच्या जगांतील कदाचित् सर्वांत अधिक क्रांतिकारक प्रवृत्तीचा होता, तो वर्ग निषेधाचा एक शब्दहि न उच्चारतां वा प्रतिकाराचें कांहींच लक्षण न दाखवितां स्वतःला निमुटपणें बाजूला ढकललें जाऊं देईल, ही गोष्ट कल्पनेच्या आटोक्यांतील आहे काय ? एकाद्या वर्गाचें आपल्या क्रांतींतील वर्तन असें असतें का ?

अशाप्रकारें निव्वळ कल्पिलेली ही प्रक्रिया उघडच एक भाकडकथा आहे. शेतकरीवर्गाला क्रांति ज्यांनीं 'दिली', त्यांना ती परत घेणें शक्य होतें. विजय होण्याच्या आधीं वा नंतर, शेतकरीवर्गाच्या हातांत क्रांतीचीं सूत्रें कधींच नव्हतीं. क्रांति केली ती वर्गहीन झालेल्या मध्यमवर्गीय तरुणतरुणींनीं व त्यांनींच सतत तिचें संचालन केलें. हें सर्व प्रथमतः आम जनतेच्या नांवाखालीं झालें, नंतर त्यांतच शेतकऱ्यांचें नांव गोवलें गेलें व आतां शेतकरी-कामगारवर्गाचें नांव घेतलें जात आहे. जास्तींत जास्त एवढेंच म्हणतां येईल, कीं क्रांति जें कांहीं करीत आहे, तें ती शेतकरीकामगारवर्गांत व त्यांच्याकरितां करीत आहे. यांतील भल्याबुऱ्याबाबत वाद होऊं शकेल; परंतु हे निर्णय **कोण** घेतें व ते कोणत्या वर्गाला लागू पडतात, याबाबत वाद होऊंच शकणार नाहीं. शेतकरीवर्ग ही समाजवादी क्रांतीची चालक शक्ति असते, ही कल्पना मार्क्सला निव्वळ अतर्क्य वाटली असती; व दुसऱ्या वर्गानें क्रांति घडवून आणल्यावर कामगारवर्गाला त्यांत 'ढकलावें' लागतें—व तेंहि राष्ट्रीयीकरणाचा प्रत्यक्ष परिणाम म्हणून—ही कल्पनाहि मार्क्सच्या दृष्टीनें तितकीच अतर्क्य कोटीं-तीलच ठरली असती.

ह्या क्रांतींत कामगारवर्गानें जी भूमिका पार पाडली असें म्हणतात, ती भूमिका शेतकरीवर्गाला देऊं केलेल्या भूमिकेइतकीच काल्पनिक आहे. डिसेंबर महिन्यांत क्यूबन इलेक्ट्रिक कंपनींत नोकरीला असलेल्या कांहींशे कामगारांनीं युनियनच्या कचेरीपासून ते अध्यक्षांच्या भवनापर्यंत एक निषेधाचा मोर्चा काढला होता. सर्वच जण असंतुष्ट होते, कारण हुकूमशाही राजवटींत मिळा-लेल्या कांहीं सवलतींवर राष्ट्रीयीकरण झालेल्या कंप-नीच्या नवा चालकानें प्रहार केला, व त्या कामगाराचें जीवनमान घसरविलें. जुन्या २६ जुलै आंदोलनांतील लढाऊ नेते चवताळले, कारण आतां पूर्णपणें कम्यु-निस्टांनीं कब्जा घेतलेल्या केंद्रीय ट्रेड युनियन फेड-रेशननें त्यांना हांकलून लावलें. युनियनचे नेते इतर राष्ट्रांच्या वकिलातींत आसऱ्यासाठीं गेले व कॅस्त्रोनें एक संतापून भाषण केलें—आणि बंडाचा बिमोड झाला. कॅस्त्रोनें भाषणांत सांगितलें कीं केवळ इलेक्ट्रिक काम-गारच नव्हेत तर सामान्यतः सर्वच कामगार 'गोंधळ लेले' आहेत. 'लेंटिल्सच्या एका प्लेटसाठीं देशाचा कारभार चालविण्याचा कामगारांच्या हक्का'चा त्याग करावयास तयार असलेल्या लोकांना त्यानें नांवें ठेविलीं. आणि 'कामगारवर्गानें लढावें असें पहिलें व एकच उद्दिष्ट कोणतें हें तुम्हांस माहित आहे काय ? कामगारवर्गानें राजकीय सत्ता काबीज करण्याकरितां लढावें !'—असेंहि त्यानें सांगितलें.

कॅस्त्रोनें प्रथमतःच वापर केलेल्या राजकीय परि-भाषेकरितां म्हणून हें भाषण उल्लेखनीय होतें, परंतु त्या








भाषणानें क्यूबन जनतेपेक्षां खुद्द कॅस्ट्रोबद्दलच अधिक सांगितलें. ' शेतकरीकामकऱ्यांच्या हुकूमशाहीं 'त सत्ता-संपादनाकरितां त्यांना धमकावण्याची आवश्यकता असेल काय? आणि जर त्यांनीं कॅस्ट्रोचा सल्ला मानला, तर मग कॅस्ट्रोच्या सरकारांत असलेले सर्व वकील सत्तास्थानीं राहतील काय? चालूं शतकांत आपल्याला देऊं करण्यांत आलेल्या सर्व हुकूमशाही राजवटींत, कॅस्ट्रोची राजवट ही सर्वांत जास्ती न पटणारी आहे.

श्री. जां–पोल सार्त्र यांनीं वर्तविलेल्या भाकिताचीहि प्रत्यक्ष घटनांनीं निर्दयपणें वाट लावली आहे. क्यूबा-वरील आपल्या लेखमालेच्या ब्राझिली आवृत्तीला लिहिलेल्या प्रस्तावनेंत ( दिनांक १२ सेप्टेंबर १९६० ) त्यांनीं म्हटलें होतें : ' नाहीं, पश्चिमी गटापासून वेगळें होण्याची जर क्यूबाची इच्छा असेल, तर पौर्वात्य गटाशीं स्वतःला जोडून घेण्याच्या वेड्या महत्त्वाकांक्षें-तून तें सिद्ध होणार नाहीं. ' ' एका गटाला कमकुवत बनवून दुसऱ्याला बळकट करण्याचें क्यूबाचें उद्दिष्ट नाहीं ' असा स्वतःचा विश्वासहि त्यांनीं आम्हांला सांगून टाकला होता. डिसेंबरच्या दहा तारखेला ८१ कम्युनिस्ट देशांच्या ' या परिषदेनें काढलेल्या पत्र-काला आमचा अंतःकरणपूर्वक पाठिंबा आहे ' असें विधान मॉस्कोंत जाहीररीत्या करण्याइतके मेजर ग्व्हॅरा ' वेडे ' होते. परिषदेच्या ह्या पत्रकाला पाठिंबा देण्या-पेक्षां पौर्वात्य गटाशीं क्यूबाला जोडण्याचा वा पाश्चि-मात्य राष्ट्रांना कमकुवत करून पौर्वात्य गट प्रबळ करण्याचा दुसरा उपाय शोधून धुंडाळणें कठीण आहे.

New Statesman मध्यें श्री. पॉल जॉनसन यांनीं सर्वसामान्यतः लॅटिन अमेरिकेविषयीं व विशेषतः क्यूबाविषयीं घेतलेल्या दृष्टिकोनांत एका विशिष्ट प्रकारच्या वसाहतविरोधी वसाहतवाद ठासून भरला आहे. त्यांच्या मतें ' निव्वळ निवडणुका जिंकून ' क्यूबासमोरील महत्त्वाच्या आर्थिक समस्या सुटूं शक-णार नाहींत, कारण ' त्या कायद्यांची परिणामकारक अंमलबजावणी करण्याकरितां सैन्याचा रुकार असणें आवश्यक असतें. ' म्हणून फक्त Fidelismo किंवा कम्युनिझम–श्री. जॉनसन यांच्या मतें हे दोन्ही ' स्वाभाविक शत्रू ' आहेत–एवढाच व्यवहार्य पर्याय राहतो. या संदर्भांत क्यूबाचा विचार केल्यास, आपल्या विधानांच्या पायाखालील जमीनच श्री. जॉनसन यांनी काढून घेतली असल्याचें आढळून येतें. कारण सैन्यच नष्ट झालें व त्याबरोबर त्याचा रुकारहि नष्ट झाला. १९५३ सालीं कॅस्ट्रोनें केलेल्या History will Absolve Me या भाषणाचें सार आणि सत्तेवर येण्यापूर्वी त्यानें केलेल्या सर्व घोषणांचें सार असें होतें, कीं १९४०च्या घटनेच्या चौकटींतच क्यूबाच्या सामा-जिक व आर्थिक समस्या सुटूं शकतील. पण घटनेंत एक गोष्ट वगळलेली होती– कोण्या Lider Maximo ची हुकूमशाही व त्याचा junta वसाहतवादी लोक असें म्हणत, कीं कांहीं लोक केवळ साम्राज्यवादी राजवटी-खालीं राहण्यासच पात्र आहेत. वसाहतविरोधी वसा-हतवादी आतां असें म्हणत आहेत, कीं कांहीं माणसें फक्त कोणत्याहि प्रकारच्या समूहवादी राजवटीखालीं राहण्यासच पात्र असतात.

शेवटून, ' समाजवाद ', ' लोकशाही ', ' मार्क्स-वाद ' आणि ' जनतेची हुकूमशाही ' हे शब्द किती मर्यादेपर्यंत ताणतां येतील कोण जाणें. निरर्थक होई-पर्यंतहि ते ताणतां येतात, असें कॅस्ट्रोच्या कांहीं स्तुतिपाठकांचें मत दिसतें.

उदाहरणार्थ, पांच वर्षांपूर्वी सोव्हिएट कम्युनिस्ट कॉंग्रेसच्या विसाव्या अधिवेशनांत क्रुश्चेव्हनें स्टाली-नच्या गुन्ह्यांचा पाढा वाचला, तेव्हां श्री. ह्यूबरमन व स्वीझी यांना धक्का बसला होता. सुयोग्य काळ चिंत-नांत व पश्चातापांत घालविल्यानंतर स्टालीनचें तत्त्व-ज्ञान म्हणजे ' वाईट उपायांनीं चांगल्याची निष्पत्ति ' असें होतें, असा सिद्धांत बनवून त्यांनीं परत मान वर केली. स्टालीनचें तत्त्वज्ञान ' समाजवादाकडे नेणारें एक साधन ' बनलें असा खुलासा त्यांनीं केला; परंतु दुर्दै-वानें ' त्यांत पौर्वात्य विध्वंसक उपाय म्हणजेच खून, क्रौर्य, दुटप्पीपणा, अप्रामाणिकपणा, आणि विशेष म्हणजे लहरीपणाहि– सामावले होते' अशी सारवासारव त्यांनीं केली ( Monthly Review, जुलै-ऑगस्ट १९५६, पृष्ठ ७१–७२ ). स्टालीनवादाविषयींच्या ह्या दृष्टिकोनाचीं मुळें समाजवादाविषयींच्या एका विशिष्ट कल्पनेंतून आलेलीं आहेत. या कल्पनेनुसार संबंध अर्थव्यवस्थेचें राष्ट्रीयीकरण करणें ही एकच काय ती

महत्त्वाची गोष्ट आहे. मग राष्ट्रीयीकरण साधणारा देश खुनी असला, अप्रामाणिक असला, दुटप्पीपणानें वागत असला, वा पाशवी व लहरी असला, तरी तो 'समाजवादी'च राहतो. आणि साध्य व साधनें, राजकीय व आर्थिक, राष्ट्राकडून संचालन होणारें व राष्ट्राचें संचालन करणारे यांची फारकत केल्यानंतर पौर्वात्य उन्मत्ततेनें वा भोंदू-शेतकरी क्रांतीनें समाजवाद गांठतां येतोच.

## क्यूबाचें वैशिष्ट्य

मार्क्सीय समाजवाद हा केवळ राष्ट्रीयीकृत अर्थव्यवस्थेच्या पायावरच नव्हे, तर इतर अनेक गोष्टींच्या विकसित मेळावर अवलंबून आहे. आर्थिक लोकशाही मूर्त करण्याकरितां समाजवादी क्रांति करणें, यांत बूर्झ्वा-लोकशाही क्रांतीनें राजकीय लोकशाही सिद्ध करतां येते ही गोष्ट गृहीतच धरलेली आहे. यामुळें सनातनी मार्क्सवादी लोकांनीं राजकीय लोकशाही गृहित धरली –असें आपण आतां करूं शकत नाहीं, आणि या पायावर आर्थिक लोकशाही उभारतां येईल अशी त्यांची कल्पना होती. समाजवाद ही, त्यांच्या मतें, भांडवलशाही विकासाची परिणति होती. आणि ह्या परिणतीशिवाय प्रगत औद्योगिक अर्थव्यवस्था आणि दरिद्री, वर्गजागरुक कामगारवर्ग या समाजवादाच्या आवश्यक अटी पुऱ्या केल्या जात नाहींत, अशी त्यांची धारणा होती.

इतिहास ह्या मार्गानें गेलेला नाहीं. जेथें भांडवलशाहीला यश मिळालें आहे, तेथें कामगारवर्ग गरीब वर्गजागरुक असण्याची अट पुरी केली गेलेली नाहीं; त्याचप्रमाणें जेथें–जेथें म्हणून भांडवलशाही यशस्वी झालेली नाहीं, तेथें तेथें प्रगत औद्योगिक अर्थव्यवस्थेची अट पुरी केली गेलेली नाहीं. एकतर भांडवलशाही अर्थव्यवस्था प्रत्यक्षांत आणण्याइतका मध्यमवर्ग भक्कम नसला पाहिजे किंवा मग समाजवादी अर्थव्यवस्थेकडे नेणारा मार्ग अटकविण्याइतका तो भक्कम असला पाहिजे.

आधुनिक समाजवादापुढील पेंच सर्वांना ज्ञात आहे; या पेंचामुळें तात्कालिक व धेडगुजरी असे कित्येक 'समाजवाद' जन्मास घातले गेले आहेत. खालच्या वर्गांतून पालवण्याऐवजीं तें मध्यमवर्गांतून डोकें वर काढतात,– म्हणजे आपली कामगिरी बजावण्यास असमर्थ ठरलेल्या मध्यमवर्गाविरुद्ध बंड करून उठणाऱ्या मध्यमवर्गांतील एका भागांतूनच. बूर्झ्वा आईबापांचीं हीं मुलें व मुली अनिवार्यपणें समाजवादाकडे झुकतात; परंतु परिस्थिति परवानगी देईल तेवढ्याच समाजवादाच्या पैलूंचा उपयोग तीं करूं शकतात. समाजवादी परंपरेच्या मूळ कल्पनांशीं तीं प्रामाणिक राहूं शकत नाहींत–शोषित जनतेनें स्वतःला मुक्त करावें, समाजवाद आणण्याकरितां कांहीं अटी आहेत त्या पूर्ण झालेल्या असल्या पाहिजेत, –विशेषतः प्रगत औद्योगिक अर्थव्यवस्थेची अट, –आणि समाजवाद हा राजकीय लोकशाहीला पूरक व परिणत करणारा असला पाहिजे–या त्या अटी होत.

परंतु ताबडतोब व अनिर्बंधपणें अवलंब करतां येईल असा एक समाजवादाचा पैलू आहे. समाजव्यवस्था बदलण्याकरितां शासनसंस्थेचा अनिर्बंध व अमर्याद वापर करण्याकरितां तात्त्विक संमति त्यांना मार्क्सवादांतून मिळूं शकते, आणि शासनसंस्थेवर स्वतःचे अनिर्बंध व अमर्याद अधिकार गाजविण्याची परवानगी त्यांना लेनिनवादांतून मिळूं शकते. सनातन व विशुद्ध मार्क्सवादांत समाजवादी शासनसंस्थेच्या भूमिकेला समाजवादी राज्य प्रस्थापित करण्याच्या वेळच्या विकासाच्या टप्प्यानें व तें प्रत्यक्षांत आणण्यांत सहभागी असलेल्या वर्गसंबंधांनीं मर्यादा घातल्या होत्या. परंतु समाजवादाच्या ह्या व्यंगरूपांत प्रमुख अट आहे ती फक्त सत्ता काबीज करण्याची; कोणीं, कशी, केव्हां व कोठें यांना कांहींच महत्त्व नाहीं. म्हणून आज निव्वळ 'क्यूबन समाजवाद'च नव्हे तर 'इंडोनेशियन समाजवाद' इतकेंच काय पण 'आफ्रिकन समाजवाद'हि आपल्याला आढळून येतो.

ह्यावरून असें दिसून येतें, कीं समाजवादावर लादलेला बोजा कमी करण्याकरितां आपल्याला नव्या शब्दांची निकड आहे. विकासाचा क्रम तर बदलतां येत नाहींच– प्रथम क्रांति, नंतर समाजवाद प्रस्थापिण्याकरितां आवश्यक अशी पूर्वपरिस्थिति– कारण नाहींतर संपूर्णतः वेगळ्या प्रकारची समाजव्यवस्था अस्तित्वांत येईल व ही समाजव्यवस्था समाजवादाच्या वेदास प्रामाणिक असणार नाहीं– मूळ हेतूस तर नाहींच



अनुक्रमणिका






नाहीं. वरून घडवून आणलेल्या ह्या क्रांत्या क्रांत्यांच्या कम्युनिस्ट घाटणींत ( यापेक्षां योग्य शब्द दुसरा नाहीं ) बरोबर बसतात, कारण अशा स्वरूपाच्या क्रांत्यांमुळें खालचा वर्ग मुक्त होण्याऐवजीं शेतकरीसमाजाचें औद्योगीकरण तेवढें होतें. परंतु आतां ह्या घाटणीचें कुटुंब एवढें विस्तारलें आहे, त्यानें एवढी अफाट भूमि व्यापली आहे, कीं त्याच्या नांवांतून कांहीं अर्थ निघेलच अशी हमी देतां येत नाहीं.

तीसेक वर्षें रशियन कम्युनिझम हा एकमेव कम्युनिझम होता; आणि परिणामीं रशियन लोक म्हणतील तो कम्युनिझम होता. मग १९४८ सालीं टिटोनें आपलें नाणें वेगळें पाडलें—रशियन वर्चस्वाविरुद्ध बंड करून उठलेलें एक छोटेंसें कम्युनिस्ट राष्ट्र—आणि १९४९ सालच्या शेवटीं चीननेंहि स्वतःची टांकसाळ उघडली —रशियाशीं सत्तास्पर्धेत टक्कर देऊं शकेल इतकें मोठें कम्युनिस्ट राष्ट्र, परंतु युगोस्लाव व चिनी दोन्ही नेतृत्वें कॉमिन्टर्न या एकाच केंद्रांतून उगम पावलीं होतीं आणि १९१९ सालापासून ते १९४३ सालापर्यंत कॉमिन्टर्नवर रशियनांचें संपूर्ण प्रभुत्व होतें, कॉमिन्टर्न संपूर्णतः रशियनांवर अवलंबून होती. येथपर्यंत वंशावळीची रेषा सरळ व स्पष्ट होती.

आतां या वृक्षाला एक नवीनच फांदी फुटण्यास सुरवात झाली आहे. क्रुश्चेव्हच्या पूर्वी अनेक वर्षें जागतिक कम्युनिस्ट आंदोलनानें एक वेगळी शक्ति म्हणून मान्यता दिलेल्या व कधीं सहकार्य तर कधीं स्पर्धा केलेल्या राष्ट्रीय-क्रांतिकारी आंदोलनांशीं ती संबंधित आहे. १९५४ सालींहि सोव्हिएट वृत्तपत्रांनीं ब्रिटिश साम्राज्यवादाचा एक 'बुरखा' म्हणून घणाचे अध्यक्ष व त्यांच्या पक्षावर हल्ला चढविला होता. आतां क्रुश्चेव्हच्या राजवटींत मात्र हा लंबक सहकार्याच्या आत्यंतिक मर्यादेपर्यंत हलला आहे. हें धोरण रशियन व चिनी कम्युनिस्ट पक्षांतील मतभेदाचें एक कारण असावेंसें वाटतें व त्यावरून एक गोष्ट स्पष्ट होते, कीं गेल्या कांहीं वर्षांत घणांत नक्रुमांशीं, गिनींत सेकू टूर यांच्याशीं किंवा क्यूबांत फिडेल कॅस्त्रोशीं स्पर्धा करूं शकेल असा एकहि कम्युनिस्ट निघाला नाहीं. म्हणून वाट पहा व एका टप्प्याऐवजीं दोन टप्प्यांत आपलें लक्ष्य गांठा, असा सल्ला स्थानिक कम्युनिस्टांना दिला गेला. प्रथमतः राष्ट्रीय-क्रांतिकारी आंदोलनानें सत्ता हस्तगत करावी नंतर ह्या राष्ट्रीय-क्रांतिकारी आंदोलनांतील सत्तास्थानें कम्युनिस्टांनीं हस्तगत करावींत.

राष्ट्रीय-क्रांतिकारी चळवळींचा वकूब अचूक ओळखला, त्यामुळें हें यश पदरांत पडलें. राष्ट्राच्या शत्रूविरुद्ध एकजूट करण्यांत कम्युनिस्ट त्यांचा हात धरूं शकत नाहींत. परंतु हा शत्रू हेंच त्यांच्या अस्तित्वाचें आदिकारण होय; त्यांच्या समोर कांहींहि सामाजिक वा राजकीय कार्यक्रम नसतो. त्यामुळें सत्ता घेण्यापूर्वींच ह्या चळवळी अतिशय प्रेरक व परिणामकारक असतात. क्रांति झाल्याच्या दुसऱ्या दिवशीं लगेंच राजकीय व सामाजिक पोकळी भरून काढण्यामुळें कम्युनिस्टांना चांगलेंच फावतें—क्रांतिकालांत त्यांना तेवढा वांव नसतो. आणि शिवाय राष्ट्रीय नेते म्हणजे प्रचंड लोकप्रियता, बौद्धिक गोंधळ व साहसी वृत्ति यांचें एक मुटकुळें असतें. त्यांचा अहंकार वखवखलेला असतो. अंगच्या गुणांमुळें त्यांना बाजूला टाकलें जात नाहीं आणि त्यांच्या दुबळेपणावर कम्युनिस्टांना प्रहार करावयास मिळतात. कम्युनिस्ट आपली सेवा करीत आहेत असा देखावा व्हावा, या एकाच अटीवर ते कम्युनिस्टांची बंदेगिरी स्वीकारतात. त्यांचा राजकीय पंथ हा कांहीं कॉमिन्टर्नसारखा नसतो; म्हणून मूळ रशियन नमुन्यापासून टिटो वा माओ त्से-तुंग जितके वेगळे पडतात, त्यापेक्षां हे लोक आणखी कितीतरी दूर पडतात.

इतर कोणत्याहि देशांपेक्षां क्यूबांत हा दुरावा पल्लेदार बनला आहे, आणि तरी महाभारत अजून संपलेलें नाहींच. त्यामुळें एका इवल्याशा बेटावरून फिडेल कॅस्त्रोनें एवढ्या लांबवर आपली छाया टाकली आहे.

फिडेल कॅस्त्रोच्या कहाणीचा गंभीर अभ्यास फारच कमी झाला आहे. त्यानें केलेली क्रांति ही त्यानें वचन दिलेली क्रांति नसेल, परंतु तरी ती एक अस्सल क्रांति होतीच. राष्ट्रीय व सामाजिक द्वेष व विषमता समान असलेल्या इतर देशांतील उठावांशीं या क्रांतीचें एक नातें आहे. दावा असलेली क्रांति ही नव्हे म्हणून विकृतीच्या उतारावर अधिकाधिक घसरणारी एक घटना असें नाक उडवून म्हणून भागणार नाहीं. तिचा प्रकारच वेगळा आहे. हा प्रकार भांडवलशाहीहि








नाहीं, समाजवादीहि नाहीं; तर भांडवलशाही जेथें यशस्वी झालेली नाहीं व समाजवाद जेथें यशस्वी होऊं शकत नाहीं, अशा परिस्थितींतून तो जन्म घेतो. कॅस्त्रोविषयींच्या उलटसुलट प्रचारांत त्याला सत्ता मिळवून देणाऱ्या क्रांतीचें चित्रण इतकें विकृत केलें जातें, कीं कॅस्त्रोचा सबंध राजकीय विकासच आद्यंत कल्पनारम्य बनतो.– डाव्या आणि उजव्या गटाचे भाकडकथाकार जे प्रश्न विचारीतहि नाहींत अशा प्रश्नांचीं उत्तरें शोधून काढण्याचा प्रयत्न प्रामाणिक अभ्यासू करील. मूलतः मध्यमवर्गीय स्वरूपाची असलेली क्रांति त्याच वर्गाविरुद्ध कशी उलटविली जाते? कम्युनिस्ट पक्षावांचून किंबहुना बहुतांशीं त्यांच्या विरोधाला न जुमानतां केलेली क्रांति शेवटीं त्यांच्याशीं एवढी संलग्न कशी होते? थोडक्यांत म्हणजे, फिडेल कॅस्त्रोनें एका क्रांतीचें अभिवचन देऊन दुसरीच क्रांति कशी घडवून आणली आणि ह्या क्रांतिकारक उन्मत्ततेतून काय घडून आलें? व हें सर्व कसें शक्य झालें?

मी आधींच सूचित केल्याप्रमाणें, वरील प्रश्नांचीं उत्तरें आपल्याला आतांपर्यंत अज्ञात अशा परिसरांत घेऊन जातात. कारण एकमेकांना भेटण्याकरितां कम्युनिस्ट व Fidelistas या दोघांनाहि आपापल्या सुरुवातीच्या स्थानापासून कांहीं अंतर काटावें लागलें आहे. कॅस्त्रोच्या विरुद्ध जाऊन नव्हे तर त्याच्या द्वारांच आपल्याला सत्ता संपादन करतां येईल, असा निर्णय कम्युनिस्टांना घ्यावा लागला. श्री. ब्लास रोका यांच्या नेतृत्वाखालील स्टालीनवादी जुना गट व कम्युनिस्ट पक्षाच्या मुखपत्राचे संपादक श्री. कार्लोस राफेल रॉड्रिग यांचें नेतृत्व लाभलेला अधिक लवचिक असा क्रुश्चेव्हच्या धोरणाचा पाठपुरावा गट, यांमध्यें १९५८ सालच्या पहिल्या सहामाहींत झालेल्या अंतर्गत झटापटींत हा निर्णय घेतला गेला असण्याची दाट शक्यता आहे.

कांहीं जबाबदार निरीक्षकांना असें वाटतें, कीं हा सौदा कॅस्त्रो सत्तेवर येण्यापूर्वी सिएरा मेस्त्रा येथें ठरला व कॅस्त्रोचीं नंतरचीं सर्व कृत्यें या करारानुसार झालीं. कांहींना वाटतें, सत्ता हातीं घेतल्यावर पहिले कांहीं महिने कॅस्त्रोनें दोलायमान मनःस्थितींत काढले. कांहीं असलें तरी कॅस्त्रोनें घेतलेले महत्त्वाचे निर्णय इतक्या गुप्ततेनें व इतक्या लहान गटाकडून घेतले गेले कीं त्याच्या मंत्रीमंडळांतील पूर्वीचे सभासदहि त्याच्या वचनबद्धतेबद्दल व हेतूंबद्दल निश्चित असें कांहींच सांगूं शकत नाहींत.

कॅस्त्रोच्या राजवटीच्या अंतरंगाचा इतिहास अद्याप लिहिला गेलाच नाहीं. परंतु त्यांतील प्रधान रेषा उत्तरोत्तर स्पष्ट होत गेल्या आहेत. लंबीं भाषणें ठोकणारा व ध्येयवादी, साहसें धुंडाळणारा व क्रांतिकारक, जितका कम्युनिस्ट तितकाच 'अनार्किस्ट' किंवा आणखी कांहीं असा हा फिडेल कॅस्त्रो अचानकपणें व अनपेक्षितपणें देशांत खरा पक्ष, खरें सैन्य किंवा प्रत्यक्ष कांहीं कार्यक्रम नसतांना सत्तास्थानावर ढकलला गेला. स्वतःच्या अशा आर्थिक वा राजकीय कल्पना देशासमोर त्यानें ठेविल्या नव्हत्या, क्यूबांत परंपरेनें चालत आलेल्या लोकशाही सुधारणा व ती भाषा यांच्या मर्यादेंतच तो राहिला होता. त्याला नसलेला उपाययोजनांचा ताळमेळ, लष्करी उठावावरील त्याचा विश्वास व हा उठाव घडवून आणण्याची त्याची धमक– यामुळें तो बॅटिस्टांच्या इतर विरोधकांपासून वेगळा पडतो. परंतु एकदां हातांत सत्ता आल्यावर तिला धरबंद घालील वा कमकुवत बनवील अशा कशालाच त्यानें परवानगी दिलीं नाहीं. स्वतःच्या व्यक्तिगत सत्तेचेंच एक रूप नसलेलें सरकार किंवा स्वतःची वेगळी वाटचाल करणारा पक्ष त्याला सहन होणें शक्य नव्हतें. त्याच्या हातांतील सत्ता व त्यानें दिलेलीं वचनें–या दोन गोष्टी आरंभापासून परस्परांशीं जुळणाऱ्या नव्हत्या. आणि त्यांच्यातील विरोधानेंच त्याला आपल्या सत्तेचा पाया बॅटिस्टा–विरोधी क्रांतीपेक्षा वेगळ्या गोष्टीवर रचावयास भाग पाडलें. त्याच्या पदरीं वा बाजूला शिस्तबद्ध व अनुभवी लोक नव्हते, त्याला कोणत्या वादाचें पाठबळ नव्हतें आणि जगांतील अवघ्या प्रेक्षकांसमोर आपल्या क्रांत्या घडवून आणण्यास आवश्यक असा आंतरराष्ट्रीय पाठिंबा नव्हता. हा पाठिंबा त्याला फक्त क्यूबन व रशियन कम्युनिस्टच मिळवून देऊं शकत होते. पूर्वी श्री. बॅटिस्टांबरोबर सहकार केल्यामुळें (त्याच्या मंत्रीमंडळांत श्री. वॉन मॅरिनेलो व कार्लोस राफेल








रॅाड्रीग हे दोघेंहि एकेकाळीं होते. आतां कॅस्ट्रोशीं हात-मिळवणी करणें त्यांना सहज शक्य होतें. श्री. ग्वव्हॅरा यांनीं नुकतेंच मॉस्कोंत सांगितल्याप्रमाणें कम्युनिस्ट व Fidelistas यांची ‘ संयुक्त आघाडी ’ एका ‘संयुक्त पक्षा’च्या दिशेनें कूच करीत आहे, व तसें झालें तर कॅस्ट्रोची नोंद इतिहासांत नव्या आंदोलनाचा Lider Maximo म्हणून न होतां जुन्याच आंदोलनाचा Pied Piper म्हणून होईल. परंतु तरी त्याला जितक्या प्रमाणांत कम्युनिस्टांची गरज आहे तितक्याच प्रमाणांत तरी जोंपर्यंत कम्युनिस्टांना त्याची गरज भासत राहील, तोंपर्यंत आपल्याला आणखीहि कांहीं धक्के देणाऱ्या घटना घडणारच नाहींत असें सांगतां येणें कठीण आहे. कॅस्ट्रोच्या अहंकारानें इतर कित्येकांना जितका त्रास दिला आहे, तितकाच त्रास तो कम्युनिस्टांनाहि देण्याची शक्यता आहे.

गेल्या वसंतांत जेव्हां मी क्यूबाहून परतलो, तेव्हां मीं लिहिलें होतें : “ स्वातंत्र्य – भाकरीसह आणि भीतिविना ’ असें आपल्या क्रांतीचें वर्णन कॅस्ट्रोनें एकदां केलें होतें. तो जर ह्याच मार्गानें जात राहिला– व तेंहि जलद–गतीनें आणि खूप दूरपर्यंत–तर क्यूबांत भीति असेल, परंतु स्वातंत्र्य वा भाकरी नसतील. ’ ( The Reporter, १२ मे १९६० ). दुर्दैवानें माझ्या ह्या सर्व दुष्ट शंका खऱ्या ठरल्या आहेत आणि कॅस्ट्रोनें क्यूबाला राष्ट्रीय क्रांतीचें दान न करतां आंतरराष्ट्रीय यादवी युद्धाचें दान मात्र केलें आहे.

---







अनुक्रमणिका

प्रा. ना. य. डोळे

# परराष्ट्रीय धोरणासंबंधीं कांहीं शंका

प्रत्येक देशाच्या परराष्ट्रीय धोरणाचा मूलाधार राष्ट्रहित हा असतो मग तो देश कम्युनिस्ट असो वा लोकशाहीवादी. राष्ट्राला घातक ठरेल असें कांहींहि करण्याची ताकद सरकारमध्यें नसते. सरकारच्या हातून अशी एखादी चूक घडल्यास त्याचें प्रायश्चित्त त्या सरकारला किंवा त्या राजकीय पक्षाला भोगावें लागतें. नेहरू पूर्वी म्हणाले होते, " देश साम्राज्यवादी, कम्युनिस्ट किंवा समाजवादी कसाहि असो त्याचा परराष्ट्रमंत्री त्याच्या देशाच्या हिताचाच मुख्यतः विचार करतो "[१] असें नसतें तर कम्युनिस्ट चीन व रशिया यांच्यांतच सरहद्दीचा तंटा उपस्थित झाला नसता. राष्ट्रहित कशांत आहे तें ओळखणें व त्याचा पाठपुरावा सतत करीत राहणें हें यशस्वी परराष्ट्रीय धोरणाचें गमक आहे. परराष्ट्रीय विभागाची संघटना किंवा परराष्ट्रमंत्र्यानीं वेळोवेळीं केलेलीं जाहीर वक्तव्यें याला दुय्यम महत्त्व आहे.

परराष्ट्रीय धोरणाप्रमाणें संरक्षण विभागाचें उद्दिष्टहि राष्ट्रहित हेंच असतें. परवडतें कीं नाहीं याचा विचार न करतां प्रत्येक छोटें मोठें राष्ट्र खड्या सैन्यदलांसाठीं अवाढव्य पैसे खर्च करीत असतें. अण्वस्त्रांच्या शोधानंतरहि प्रचलित शस्त्रास्त्रदलांचें महत्त्व कमी झालेलें नाहीं, त्यामुळें प्रत्येक राष्ट्राला कांहीं संपत्ति व मनुष्यबळ संरक्षणासाठीं वेगळीं ठेवावीं लागतात. उद्दिष्टें व तीं साध्य करण्याचीं साधनें यांच्यांत समानता असल्याने परराष्ट्रीय विभाग व संरक्षण विभाग यांच्यांत फार घनिष्ट संबंध असतात. या खात्याचें राष्ट्रजीवनांत एवढें महत्त्व आहे कीं पंतप्रधान स्वतःकडे बहुधा परराष्ट्रीय विभाग ठेवतात व आपल्या अगदीं निकटच्या विश्वासू सहकाऱ्याकडे संरक्षणविभाग सोपवितात.

लोकशाही राष्ट्रांच्या परराष्ट्रीय धोरणांचा विचार करतांना कांहीं तत्त्वें गृहीत धरण्यांत येतात. उदा. ' परराष्ट्रीय धोरण हें अन्तर्गत धोरणाचें बाह्य प्रक्षेपण असतें. ' किंवा ' परराष्ट्रीय धोरणावर जनतेचा अंकुश असतो व असावा. ' खरें म्हणजे कधीकधीं देशाच्या परराष्ट्रीय धोरणाचा अन्तर्गत धोरणावर परिणाम होतो. परिणाम होतो इतकेंच नव्हे तर त्यांत मूलभूत फरकहि होतो. आपल्या देशांतील मिश्र अर्थव्यवस्था सार्वजनिक क्षेत्राकडे थोडी झुकलेली आहे. या अन्तर्गत परिस्थितीमुळें सत्तागटांपासून अलिप्त पण एका सत्तागटाकडे थोडें झुकलेलें असें आपलें परराष्ट्रीय धोरण झालें आहे कीं या प्रकारच्या आंतरराष्ट्रीय धोरणामुळें मिश्र अर्थव्यवस्था पत्करणें आवश्यक झालें. क्यूबा कम्युनिस्ट झाला म्हणून अमेरिकेचे व त्यांचे संबंध बिघडले कीं अमेरिकेनें छळणूक चालविल्यामुळें त्यांना देशांत कम्युनिस्ट पद्धतीचा अंगीकार करावा लागला ? १९५१ सालीं रशियाच्या खालोखाल जास्तीत जास्त कम्युनिस्ट तुरुंगांत असलेला देश हिंदुस्थान होता.[२] त्यावेळीं आंतरराष्ट्रीय धोरणांत सहअस्तित्व आपण सांगत होतो. नंतर केरळमध्यें कम्युनिस्ट निवडणुकीच्या मार्गानें जगांत प्रथमच अधिकारावर आले त्यावेळीं अंतर्गत क्षेत्रांतील सहजीवन असा त्याचा उदोउदो सर्वांनीं केला. २८ महिन्यानंतर तें सरकार नष्ट झालें तरी परराष्ट्रीय धोरणांत सहजीवन चालूच राहिलें. तेव्हां खरोखर अन्तर्गत धोरण व देशाचें परराष्ट्रीय धोरण यांचा अन्योन्य संबंध काय आहे यावर बराच विचार केला पाहिजे. जुनीं गृहीतें खरीं धरून चालणार नाहीं.

१. नेहरूंचें घटनासमितींतील भाषण डिसेंबर १९४७.

२. ' India : a pattern for Democracy in Asia ' report prepared by State Department of U. S. quoted in Ambassador's report by Chester Bowles, p. 65.








दुसरें गृहीतहि तपासून पाहिलें पाहिजे. लोकशाही सरकार लोकांना जबाबदार असतें. अन्तर्गत व परराष्ट्रीय क्षेत्रांत सरकारच्या धोरणावर लोकांचा ताबा असला पाहिजे व धोरण जनतेला जबाबदार राहिलें पाहिजे. सरकारनें आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत एखादा निर्णय जाहीर केला किंवा नवी अवघड जबाबदारी स्वीकारली तर त्याला जनता बांधली जाते. सरकारनें चुकीचा निर्णय घेतला तर त्रास जनतेला होतो, हें सर्व तत्त्वतः ठीक आहे.

प्रश्न असा आहे कीं जनता किंवा तिचे कायदेमंडळांतील प्रतिनिधि परराष्ट्रमंत्री किंवा संरक्षणमंत्री यांच्यावर कांहीं अंकुश खरोखर ठेवूं शकतात काय ? आणि जर हें खरें असेल तर तें हितकरहि आहे काय ? थोडक्यांत म्हणजे लोकशाही राष्ट्रांत राष्ट्रहित कोण ठरवितें. कारण राष्ट्रहित हा परराष्ट्रीय धोरणाचा मुख्य आधार आहे. जेथें लोकशाही नाहीं त्या राष्ट्रांत ही समस्या नसते; कारण तेथें जनतेची इच्छा, लोकप्रतिनिधींचीं मतें व सरकारनें घेतलेले निर्णय यांत -निदान तत्त्वतः तरी- फरक नसतो. 'जनतेचें सरकार' जें जाहीर करतें तें जनता सहर्ष मान्य करते. लोकशाही राष्ट्रांत मात्र मतभेदाचे प्रसंग भरपूर येतात. राष्ट्रहित म्हणजे काय व तें कसें साध्य करावयाचें या अत्यंत मूलगामी प्रश्नावरहि सरकार, लोकप्रतिनिधि व जनता यांच्यांत कडक वैचारिक संघर्ष उत्पन्न होतात.

विसाव्या शतकांतील युद्धांना वैचारिक युद्धें म्हणण्याचा विचारवन्तांचा प्रघात आहे कारण हीं युद्धें विचारसंघर्षांतून निर्माण होतात व परस्परांसमोर दोन विचारप्रवाह व्यक्त करणाऱ्या समाजव्यवस्था असतात. आतां पूर्वीप्रमाणें युद्धकैद्यांची आपोआप अदलाबदल होत नाहीं. त्यांचे मेंदू धुण्याचें काम चालतें व कांहीं युद्धबंदी आपल्या मातृभूमीकडे परतण्याचें नाकारतात. युद्धें वैचारिक पातळीवरून लढलीं जातात व त्यामुळें परराष्ट्रीय धोरणाचें अधिष्ठानहि निश्चित विचारधारा त्याला अनुरूप अशी समाजव्यवस्था हेंच असतें. आंतरराष्ट्रीय झगड्यांत दोन्ही पक्ष सारखेच दुष्ट किंवा सारखेच सज्जन असें म्हणून चालत नाहीं. प्रत्येक परराष्ट्रमंत्री प्रत्येक प्रश्नाच्या वेळीं त्याला जी सत् बाजू वाटत असेल त्या बाजूनें आपला आवाज उठवतो. कांहीं राष्ट्रांना एक विशिष्ट बाजू सतत व चिरकाल सत् आहे असें वाटतें. यामुळें एका परराष्ट्रमंत्र्याला जें 'आक्रमण' वाटतें तें दुसऱ्याला 'मुक्तिसंग्राम' वाटणें साहजिक आहे. एका राष्ट्रांत परकीय फौजा असल्या तर त्याकडे दुर्लक्ष केलें जात नाहीं; दुसऱ्या राष्ट्रांत परकीय रणगाडे आले तर ते कायदेशीर सरकारनें बोलावले म्हणून योग्य ठरतें. एका हुकूमशाहाला राजनैतिक, नैतिक सर्व प्रकारची मान्यता दिली जाते तर दुसऱ्या तशाच प्रकारच्या हुकूमशहाला भेटहि नाकारली जाते. म्हणजे परराष्ट्रीय धोरणांतील निकष आतां चिरंतन सत्य व टिकाऊ किंवा त्रिकालाबाधित नाहींत. अशा परिस्थितींत परराष्ट्रीय मंत्र्याला त्याच्या देशांतील लोकांकडून किंवा विरोधी पक्षीयांकडून विरोध झाला तर आश्चर्य नाहीं. कारण त्यांचीहि विशिष्ट वैचारिक निष्ठा असते व त्याच्या चष्म्यांतून ते आंतरराष्ट्रीय घटनांकडे पाहत असतात. आपलीं मनें अजून १९ व्या शतकांत वावरत असल्यानें आपल्याला असें वाटतें कीं इतर अन्तर्गत बाबतींत पक्षांनीं वाटेल तेवढें भांडावें पण परराष्ट्रीय संबंधांत सर्वांनीं परराष्ट्रमंत्र्याच्या पाठीशीं उभें राहावें[3]. परराष्ट्रीय राजकारणांत हा लोकशाही राष्ट्रांचा दुर्बलपणा आहे असें आपल्याला वाटतें. राष्ट्राचा शत्रू कोण यासंबंधी सुद्धां राष्ट्रांतील सर्वांचें एकमत होऊं नये याचें आपल्याला भाबडेपणानें फार वाईट वाटतें.

परराष्ट्रीय धोरणाचा पाया असलेलें राष्ट्रहित कशांत आहे यावरहि लोकशाही राष्ट्रांतील सर्व पक्षांचें एकमत होत नाहीं. चर्चेसाठीं असें गृहीत धरलें कीं त्यांचें त्यावर एकमत झालें. दुसरा मतभेदाचा मुद्दा असा येईल कीं तें राष्ट्रहित साध्य करावयाचीं साधनें कोणतीं ? आक्रमण झालें कीं नाहीं यावर सुद्धां सर्व राजकीय पक्षांचें एकमत होत नाहीं. या आक्रमणाचा उद्देश काय यावरहि मतभेद असतात. तें आक्रमण कसें परतवून लावावयाचें यावर वादंग माजतात. या आक्रमणामुळें युद्धाचा संभव आहे कीं नाहीं यावर तीव्र मतभेद होतात. यामुळें जागतिक क्षेत्रांत संपूर्ण राष्ट्राच्या वतीनें मी बोलतो आहे अशी खात्री कोण-

३. 'वयं पंचाधिकं शतम्' वगैरे.

त्यांहि लोकशाही राष्ट्राच्या पंतप्रधानाला नसते. यामुळें लोकशाही राष्ट्रांचें परराष्ट्रीय धोरण आंखणें व तें चालविणें हें अतिशय अवघड काम आहे.

याशिवाय इतरहि अडचणी आहेत.

आपण असें मानतो कीं देशाचें परराष्ट्रीय धोरण जनता निश्चित करते, त्यावर नियंत्रण ठेवते व त्यावर देखरेख करते. हें खरें आहे कां ? १९ व्या शतकांत असें नव्हतें. "सम्राट, राजा किंवा अध्यक्ष यांच्या हातांत त्यावेळीं सर्व धोरण असे. परराष्ट्रीय मंत्री जनतेचा प्रतिनिधि नसून राजाचा नोकर असे. पडद्या-आड सर्व घटना घडत. व विश्वासू, नम्र व मूर्ख ( confidant, submissive & stupid. ) अशा जनतेच्या डोक्यावर त्या आदळल्या जात. वृत्तपत्रें कधीं टीका करीत पण बहुधा त्या सर्व घटनांचें स्वागत केलें जाई व 'होऊन गेलेली गोष्ट' ( fait accomli ) या दृष्टीनें त्यांतून कांहींतरीं चांगलें शोधण्याचा प्रयत्न होई "[४] आजसुद्धां घटना व निर्णय परराष्ट्रीय व संरक्षण विभागांत तयार होतात व ते लोकांकडे फेकले जातात.[५] विसाव्या शतकांतील लोकांना 'विश्वासू, नम्र व मूर्ख' म्हणणें बरें नाहीं पण त्यांनाहि घडून गेलेली गोष्ट म्हणूनच घटनां-कडे पाहावें लागतें व त्यांतूनच हितकर शोधावें लागतें. १९ व्या शतकांतील जेफर्सन उद्गारला होता कीं, 'परराष्ट्रीय संबंधाची अम्मल बजावणी करण्याचें काम केवळ शासनसंस्थेचें आहे' विसाव्या शतकांतील नेहरूंचें मतहि असेंच आहे. संसदेचें अधिवेशन चालू असतांना, तिची अनुमति न घेतां सरकारनें काँगोला लढाऊ सैनिक धाडले त्यावेळीं विरोधी पक्षीयांनीं लोक-सभेंत गिल्ला केला असतां नेहरू म्हणाले : 'परराष्ट्रीय प्रश्नांत शासनसंस्थेचे अधिकार मर्यादित करणें शहाण-पणाचें नाहीं.'[६] परराष्ट्रीय धोरणावर जनतेचा अंकुश असावा याचा सर्वांत जास्त आग्रह धरणारा वुड्रो विल्सनहि जेव्हां प्रत्यक्ष परराष्ट्रीय धोरणाच्या भोवऱ्यांत सांपडला त्यावेळीं 'जनतेच्या साक्षीने घेतलेले जाहीर निर्णय' हें स्वतःचें तत्त्व विसरला आणि १९ व्या शतकांतील 'गुप्त मार्ग व उद्दिष्टेंहि गुप्त' या तत्त्वाचें त्यानें अवलंबन सुरू केलें. (व्हर्सायच्या तहाच्या वाटा-घाटी काय जाहीरपणें झाल्या ? )

परराष्ट्रीय धोरणावर लोकांचें नियंत्रण हवें असें अनेक लोक बोलतात पण त्याची निश्चित मर्यादा त्यांना माहिती नसते. राजनैतिक वाटाघाटी व पर-राष्ट्रीय धोरण एक आहे अशी अनेकांची समजूत आहे. 'चव्हाट्यावरील राजनैतिक वाटाघाटी' किंवा 'परराष्ट्रीय धोरणावर जनतेचें नियंत्रण' हे वाक्-प्रचार विरोधाभासाचीं उदाहरणें वाटावींत अशी सध्यां परिस्थिति आहे. आंतरराष्ट्रीय वाटाघाटींचें उद्दिष्ट विजय नसून कांहींतरी तडजोड शोधणें हें असतें. अण्वस्त्रांच्या युगांत आतां एका पक्षाचा संपूर्ण विजय व दुसऱ्याचा संपूर्ण पराभव ही स्थिति राहिलेली नाहीं. तडजोड शोधणें हा मुद्दा महत्त्वाचा असल्यानें वाटा-घाटी जाहीरपणें चालू आहेत कीं गुप्तपणें याला फारसें महत्त्व नाहीं. वाटाघाटी हें साधन आहे. यूनोमध्यें निर्णय घेतले कीं जिनिव्हामधें, बेलग्रेडमधें कीं दिल्लीला यामधें लोकांना स्वारस्य नाहीं. घेतलेले निर्णय प्रामा-णिकपणें पाळले जातात कीं नाहीं याला खरें लोकांच्या दृष्टीनें महत्त्व आहे. सध्यांसुद्धां वाटाघाटी गुप्त होतात व निर्णय जाहीर होतात. वाटाघाटी जाहीर सुरू झाल्या तर निर्णय घेतां येत नाहींत अशी परिस्थिति उत्पन्न होते.

डी. टॉक्व्हेली या इटालियन विचारवंतानें मागें नमूद केलेले विचार चिंतनीय आहेत. तो लिहितो : 'लोकशाहीमधें' अंगभूत असलेल्या गुणांचा परराष्ट्रीय राजकारणांत क्वचितच उपयोग होतो. लोकशाहींत ज्यांचा अभाव आहे अशाच गुणांची तेथें नितांत गरज आहे. अतिशय महत्त्वाचें कार्य ठरविणें, त्याचा तपशील तयार करणें, योजनाबद्ध आराखडा निश्चित करणें व गंभीर अडचणी आल्या तरी त्या आरा-खड्यानुसार काम करीत राहणें हें लोकशाही समाजाला

४. Sir Harry Johnston, Commonsense in Foreign Policy pp. 1–2.

५. कोरियांत सैन्य पाठविलें नाहीं; काँगोंत पाठविलें. कॉमनवेल्थचें सभासदत्व भारतानें स्वीकारलें. काश्मीरचें युद्ध थांबवून प्रश्न यूनोंत कां नेला ? चीनचें आक्रमण.

६. नेहरू : लोकसभा.



अनुक्रमणिका







एकंदरीत फार अवघड पडतें. सर्व साधनांचा गुप्तपणें एकसमयावच्छेदें वापर करून शांतपणें त्याचा परिणाम कसा होतो हें पाहणें लोकशाही सरकारला जमत नाहीं.[६]

परराष्ट्रीय धोरणावर—लोकशाही सरकारांतहि—जनतेचा कांहीं महत्त्वपूर्ण ताबा असतो असें दिसत नाहीं. जेफर्सन तर उघडपणें म्हणाला होता कीं, "स्वतः शासनसंस्थेवर नियंत्रण ठेवण्याची लोकांची योग्यता नाहीं, त्यांना किंवा त्यांच्या प्रतिनिधींना एवढाच अधिकार आहे कीं शासनसंस्था कोणी चालवावी तो माणूस त्यांनीं निवडावा. जनता स्वतः कायदे करूं शकत नाहीं. कायदे करण्यासाठीं तिनें प्रतिनिधि-निवडून द्यावेत.'[७] जनतेचा परराष्ट्रीय धोरणावर ताबा नाहीं ही एका दृष्टीनें हितावहच गोष्ट आहे. कारण "युद्ध कीं शांतता याबाबतींत लोकमत नेहमीं चुकीचें असतें.'[८] परराष्ट्रीय धोरणांतील निर्णय लष्करी डावपेचाचे व राजनैतिक स्वरूपाचे असतात; दीर्घकालीन अनुभव, सखोल ज्ञान, निर्णय करण्याची अचूक शक्ति व सर्वांत महत्त्वाचें म्हणजे द्रष्टेपणाची या निर्णयांना गरज असते. हे गुण सर्वसाधारण लोकसमूहांत किंवा त्यांच्या सर्वसाधारण प्रतिनिधींत असणें शक्य आहे का? वृत्तपत्रांच्या मथळ्यांवर नजर टाकणें, मधूनमधून देशीविदेशी रेडिओ ऐकणें, जाहीरसभांतून नेत्यांना पाहणें व त्यांचीं भाषणें ऐकणें, तज्ञाचें एखादें व्याख्यान ऐकणें व कांहीं स्वस्त पुस्तकें चाळणें यामुळें का लोकांना परराष्ट्रीय धोरणांतील डावपेचाचें आकलन होणार आहे? राष्ट्रानें शस्त्रास्त्रसंभार वाढवावा कीं कमी करावा; पेटलेल्या संघर्षांत भाग घ्यावा, त्यांतून हळूंच माघार घ्यावी कीं अलिप्त रहावें हें ठरविण्याची लोकांची कुवत नाहीं. ते निर्णय सरकारनेंच घेतले पाहिजेत.

म्हणजे परराष्ट्रीय धोरणांतील अतिशय बिकट समस्यांची व त्यांच्या दूरगामी परिणामांची माहिती जनतेला नसते. परराष्ट्रीय मंत्र्याला विविध मार्गानें जेवढी माहिती मिळते त्या मानानें संसदसदस्यांना एकशतांशहि माहिती नसते. आणि तरीसुद्धां पुस्तकांतील लोकशाहीच्या तत्त्वानुसार लोक व लोकप्रतिनिधि विविधमार्गें सरकारच्या परराष्ट्रीय धोरणावर नियंत्रण करण्याचा प्रयत्न करीत असतात. लाओ, कॉंगो, क्यूबा, बर्लिन इत्यादि समस्यांचा अल्पहि गंध नसलेल्या लोकांचा जाहीर सभांतून सरकारी धोरणाला समर्थक किंवा निषेधक असे ठराव पास होतात. आपल्या स्वतःच्या भीति व इच्छांतून निर्माण झालेल्या अफवांवर पुष्ट होण्याची प्रवृत्ति लोकमतांत असते. सध्या जागतिक राजकारणांतील प्रश्न इतके ज्वालाग्राही आहेत कीं लोकमत प्रक्षुब्ध होण्यास लहानशी ठिणगीहि पुरी पडते. १९१७ पासून लोकशाही राष्ट्रांचा असा अनुभव आहे कीं ऐन आणीबाणीच्या वेळीं लोकमत चुकीचें व विध्वंसक असतें. व त्याचा फायदा लोकशाहीच्या शत्रूंना मिळतो.[९]

शृंगापत्ति आतां स्पष्ट झाली असावी. परराष्ट्रीय धोरणावर लोकांचें नियंत्रण असावें हें तत्त्वतः ठीक पण लोक त्या कामाला युक्त नाहींत ही सत्यस्थिति. लोकांना विविध समस्यांची माहिती नसते. त्यांनीं ती संसदेंत मिळविण्याचा प्रयत्न केला तर 'सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें ही माहिती सरकार देऊं शकत नाहीं' असें फटकळ उत्तर त्यांना मिळतें. कांहीं गोष्टी सरकार लोकसभेपासून दडपून ठेवीत आहे असा आरोप झाल्याबरोबर कोणत्याहि देशाच्या परराष्ट्रीय मंत्र्याप्रमाणें नेहरूंनीं ठणकाहून सांगितलें : "या सभागृहांत असे प्रश्न विचारले जात आहेत कीं त्यांचीं उत्तरें देणें आम्हाला अवघड आहे. कारण ज्या लोकांना आम्हाला माहिती द्यावयाची नाहीं त्यांना ती माहिती आमच्या उत्तरांतून मिळेल. सभागृहापासून कांहीं दडवून ठेवण्याची आमची इच्छा नाहीं पण जें सभागृहाला समजेल तें सर्व जगाला समजेल व म्हणून 'आम्ही काय करीत आहोत व कोणती पावलें टाकणार आहोत' तें आम्हीं सभासदांना सांगू शकत नाहीं"[१०] यांत नेहरूंची चूक नाहीं. कोणताहि सुज्ञ परराष्ट्रीय मंत्री लोकांना सर्व माहिती देऊं शकणार नाहीं. आणि अशी

७. वॉल्टर लिपमनचें पब्लिक फिलॉसफी – दुसरें प्रकरण पहा.
८. जेफर्सन वर्क्स - फोर्ड एडिशन V. p. 103-4, 1892–98.
९. वॉल्टर लिपमन – प. फि.
१०. Ibid p. 23.



अनुक्रमणिका

माहिती मिळाल्याशिवाय लोकांचे निर्णय साधार असणार नाहींत. संरक्षणविभागांतील तर कांहींच लोकांना समजत नाहीं.

सर्वसाधारण उद्दिष्टें व ढोबळ आराखडा यांच्या शिवाय परराष्ट्रीय धोरणासंबंधीं लोकांना कांहीं माहीत नसलें तरी लोक चूप बसत नाहींत. लोकमताचें दडपण आणून परराष्ट्रीय धोरण बदलविण्याची त्यांची खटपट चालूच असते. या लोकमताचा दबाव कधीकधी इतका जबरदस्त असतो कीं दुर्बल शासनसंस्था त्यापुढें नमते. हें लोकमत संपूर्ण माहितीवर आधारलेलें नसूनहि दुर्बल परराष्ट्रमंत्र्याला आपले सुयोग्य निर्णय बदलावे लागतात व मग एकूण राष्ट्राला मानहानि पत्करावी लागते. लोकांना सर्व व संपूर्ण सत्य सांगून चालत नाहीं. लोकांना तें आवडतहि नाहीं कारण कधींकधीं सत्य हें कडवट असतें. अशा स्थितींत लोक शासनसंस्थेला आवश्यक तें स्वातंत्र्य कां देत नाहींत? सरकार ज्यावेळीं अतिशय बिकट परिस्थितींत असेल त्यावेळीं राजकीय पुढारी सरकार देऊं शकणार नाहीं हें माहित असूनहि माहिती मागतात; आपल्याच सरकारची दुर्बलता नेमकी उघडी करतात; आणि जनतेला भयग्रस्त व क्षुब्ध बनवितात. युद्धासंबंधी चार्चिल माहिती देईना त्यावेळीं संसदेचे सदस्य म्हणाले कीं : 'क्रिमियन युद्धाच्या-वेळीं ग्लॅडस्टन पार्लमेंटला अधिक माहिती देत असे !'[११] कोरियाच्या युद्धांत ब्रिटिश सरकार गुंतलें असतांना डीन ऑफ कँटरबरीनें जंतुयुद्ध संबंधीं कम्युनिस्ट चीनच्या बाजूनें जाहीरपणें साक्ष दिली. देशद्रोहाच्या आरोपावरून त्या लाल डीनवर खटला भरता आला नाहीं कीं त्याच्यावर भाषणबंदी घालतां आली असे लालडीन फक्त इंग्लंडमधेंच नाहींत; सर्व लोकशाही राष्ट्रांत ते आहेत व त्यांच्यासंबंधीं लोकशाही सरकारें कांहीं करूं शकत नाहींत. लोकशाही सरकारांची ही दुर्बलता अँथनी ईडननें आपल्या आत्मवृत्तांत ( Full circle ) अतिशय सुंदररीतीनें मांडली आहे. सुवेझवर हल्ला करण्याचा हुकूम देऊन तो इंग्लंडचें राष्ट्रहित टिकविण्याचा प्रयत्न करीत होता त्यावेळीं त्याचेच बांधव त्याच्यावर इतके उलटले कीं त्याच्या राजकीय जीवनाची होळी झाली. इंग्लंड-ईजिप्त संबंधावर एक लेख बेव्हननें जनरल नगीबच्याच कैरोमधील वृत्तपत्रांत लिहिला. त्यावर टीका होतांच त्यानें बाल्डविन व चेंबर्लेन या सरकारांवर टीका करणाऱ्या चर्चिलच्या लेखांचे दाखले दिले. पंतप्रधान ईडनला सभागृहांत व रस्त्यारस्त्यावर लोकांच्या निर्भर्त्सनेला तोंड द्यावें लागलें. ज्यावेळीं इंग्लिश सैन्य ईजिप्तमधें लढत होतें त्यावेळीं लेबर पक्षानें देशांत ईडनविरुद्ध आघाडी उघडली. ज्या लोकांनीं ईडनला पाठिंबा दिला ते 'रानटी टोळीवाले असून साम्राज्यवादी भावनांचा ब्रिटिश अवशेष त्यांच्यांत आहे' अशी त्यांची हेटाळणी जॉन स्ट्रॅचीनें केली[१२] आणि आपल्या ग्रंथांत 'साम्राज्यां-मुळें कांहीं फायदा नाहीं' असें खास प्रकरण लिहून आपल्या विचारांचें समर्थन केलें.[१३] लोकशाही राष्ट्रांच्या परराष्ट्रीय धोरणावर विध्वंसक व पक्षाघात करणारा परिणाम लोकमत करतें अशीं आणखी कितीतरी उदाहरणें दतां येतील.

प्रत्येक सरकारी निर्णय अवघड असतो. परराष्ट्रीय किंवा संरक्षण विभागांतील निर्णय तर अधिक अवघड असतात. कधींकधीं लोकशाही सरकारांना सुलभ वा लोकप्रिय मार्गांचा त्याग करून अप्रीति ओढवून घेणारे अवघड निर्णय घ्यावे लागतात. सरकारमध्यें अशा कांहीं व्यक्ति असतात कीं त्यांना विशिष्ट प्रसंगीं काय करावयाला पाहिजे याचा अचूक अंदाज आलेला असतो. पण तत्कालीन लोकमताच्या विरुद्ध जर तो निर्णय असेल तर तो जाहीरपणें मांडावयाची त्यांची छाती नसते. राजकारणांत अप्रिय बोलून दाखविण्यासाठीं एक विशिष्ट धैर्य लागतें. दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, लोकशाहींत आपण लोकमताच्या मागें धावणाऱ्यांवरहि टीका करतो व लोकमताची पर्वा न करणारांवरहि टीका करतो.'[१४] लोकशाही समाजव्यवस्थेंत नेते नेते न राहता जनतेचे

११. नेहरू लोकसभा १८ फेब्रुवारी १९६१.

१२. End of an Empire – John Stratchey p. 205.

१३. Empires do not pay.

१४. John F. Kennedy – Profiles in courage.



अनुक्रमणिका








गुलाम बनतात व 'या गुलामीचें समर्थन केलें जातें कीं लोकशाहीमध्यें नेते जनतेचे सेवक असतात'[१५] स्वतःच्या सद्सद्विवेकबुद्धीनें वागणारे व लोकमताच्या काहूरांतहि निष्ठा न सोडणारे राजकारणी फार थोडे आहेत. वैचारिक श्रद्धा असल्यानें अप्रियतेचा धोका पत्करूनहि शहाणपणाचा मार्ग स्वीकारणारे नेते तर त्याहूनहि थोडे आहेत.[१६] राजकारणी पुढाऱ्यांना ज्या धैर्याची आवश्यकता असते त्या धैर्याचें वर्णन अमेरिकेच्या अध्यक्षांनीं 'धैर्यशीलांचीं शब्द चित्रें'[१७] या पुस्तकांत फार समर्थपणें केलें आहे. मतदारसंघ, हितसंबंधियांचे गट, स्वतःचा राजकीय पक्ष, सहकाऱ्यांचा विश्वास, कुटुंबाच्या गरजा, पदामुळें आलेला स्वाभिमान, तडजोडीची आवश्यकता; पुन्हां निवडून येण्याची स्वाभाविक इच्छा या सर्व दडपणांमुळें लोकशाही राज्यकर्त्यांना मनांतील खरे पण अप्रिय विचार बोलून दाखविण्याची चैन परवडत नाहीं. दिवसेंदिवस शासनसंस्थेनें आमचें नेतृत्व न करतां केवळ आमचीं मतें नोंदविण्याचें काम करावें अशी मागणी वाढत आहे व त्यामुळें निवडून आलेल्या प्रत्येक शासकाचें योग्य निर्णय घेण्याचें स्वातंत्र्य मर्यादित होत चाललें आहे. चर्चिल किंवा नेहरू असे थोडे अपवाद आहेत कीं त्यांनीं लोकमताला कधीं बगल तर कधी सामना देऊन अप्रिय पण पथ्यकर निर्णय लोकांवर लादले. पण त्यांनाहि आपली अफाट लोकप्रियता कधीं कधीं धोक्यांत घालावी लागली. असा जुगार प्रत्येक परराष्ट्रमंत्र्याला शक्य होत नाहीं. शहाणपणाचा मार्ग व लोकप्रिय मार्ग एक नाहीं हें माहीत असूनहि कांहीं परराष्ट्रीय मंत्री लोकमताला नाराज करूं इच्छित नाहींत. वॉशिंग्टन, जेफर्सन, केनेडी, नेहरू, चर्चिल हें स्वमताचा आग्रह धरतील पण हे लोक फार थोडे आहेत. विल्सन ईडन चेंबर्लेन यांना हें जमलें नाहीं. इतर संसदेंमधील किंवा बाहेरच्या लोकमताच्या प्रतिमेमागें धावतात, आणि राष्ट्राला चुकीच्या मार्गानें नेतात.

परराष्ट्रीय धोरणावर जनतेचें नियंत्रण असतें; संसदेला तें जबाबदार असतें हा एक भ्रम तरी आहे किंवा तें खरें असलें तर तें धोकादायक आहे. या शृंगापत्तीतून लोकशाही राष्ट्रें कसा मार्ग काढणार ही मोठी समस्या आहे.

---

१५. Public Philosophy – Walter Lippman p. 31.

१६. चीनची स्वारी होऊनहि पंचशील बरोबर आहे म्हणणारे नेहरू.

१७. J. F. Kennedy. Profiles in Courage. पां. वा. गाडगीळांनीं मराठी भाषांतर केलें आहे. धैर्यशीलांचीं शब्दचित्रें.





अनुक्रमणिका

बॅ. पां. ना. कारेकार

# भारतीय घटनेंतील मूलभूत हक्क व सामाजिक परिवर्तन*

मला दिलेला विषय ' भारतीय घटनेंतील मूलभूत हक्क व सामाजिक परिवर्तन ' असा आहे. भारत स्वतंत्र झाला, भारतामध्यें लोकशाही राज्यपद्धति निर्माण करण्यांत आली व व्यक्ति ही राष्ट्रविकासाची केंद्रबिंदु झाली. भारतीय घटनेनें नागरिकांना मूलभूत स्वातंत्र्याचे हक्क प्रदान करून धर्मभेद, जातिभेद, लिंगभेद इत्यादींनी निर्माण झालेली विषमता नष्ट केली व समतेच्या तत्त्वावर भारताच्या प्रगतीची वाटचाल सुरू केली. तद्वतच अस्पृश्यता नष्ट करून भारतीय समाजांतील कलंक दूर केला. अशा रीतीनें भारत एकसंघ करून राष्ट्रप्रगति साधण्याचें व राष्ट्रवैभवांमधून जागतिक शांतता प्रस्तापित करण्याचें मानवतावादी ध्येय भारतीय घटनेनें भारतीयांचें ध्येय म्हणून पुढें ठेवलें. पण भारतीय घटनेला अभिप्रेत असलेली समाजरचना आज भारतांत आहे काय ? व ती समाजरचना घटनाप्रणित ध्येय गाठूं शकेल काय, हा प्रश्न साहजिकच उपस्थित होतो व त्याचें उत्तर नकारार्थी असेंच द्यावें लागतें. भारतीय स्वातंत्र्यांनंतर एकसंध भारत निर्माण होण्याऐवजीं धार्मिक, जातीय, व वर्णभेदात्मक संघर्ष आणखी वाढीला लागले, हें स्पष्टपणें दिसून आलेलें आहे. व अश्या प्रकारचे संघर्ष, टाळण्यासाठीं मार्ग सुचविण्याकरितां कॉंग्रेस पक्षानें श्रीमती इंदिरा गांधी यांच्या अध्यक्षतेखालीं एक समितीहि नेमलेली आहे. सामाजिक संघर्ष टाळून एकजिनसी भारतीय समाज निर्माण झाल्याशिवाय भारतीय स्वातंत्र्य अबाधित राहूं शकणार नाहीं. व आजच्या वैज्ञानिक जगतांत भारत मानाचें स्थान मिळवून घटनेनें पुढें ठेवलेलें ध्येयमंदिर गाठूं शकणार नाहीं. याकरितां घटनेनें दिलेल्या समता आणि स्वातंत्र्य या तत्त्वांच्या अधिष्ठानावर सामाजिक परिवर्तन घडवून आणणें अवश्य आहे. पण त्यापूर्वी भारतीय समाजाची आजची घडण कशी आहे, हें समजावून घेऊन नंतरच परिवर्तनासाठीं आवश्यक अशी उपाययोजना आंखतां येईल.

भारतीय समाजामध्यें आज दोन प्रकारचा संघर्ष आहे:– ( १ ) धर्म संघर्ष – हिंदु, बुद्ध, इस्लाम व ख्रिस्ति हे प्रमुख धर्म असून त्यांच्यामध्यें असलेला संघर्ष; ( २ ) हिंदुसमाजांतर्गत असलेला वर्ण व जातिसंघर्ष. म्हणून सामाजिक परिवर्तनाचा विचार करीत असतांना या दोन्ही प्रश्नांचा विचार करणें अवश्य आहे. प्रथम बहुसंख्य असलेल्या हिंदु समाजाचा विचार करूं.

## वैदिक अथवा हिंदु समाजरचना

वैदिक अथवा हिंदु समाजरचना धर्माधिष्ठित असून चातुर्वर्ण्य हा तिचा पाया आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र या चार खांबांवर वैदिक समाजरचना निर्माण झालेली असून धर्मानें प्रत्येक वर्णाचा आचारधर्म निश्चित करून दिलेला आहे. ही वर्णव्यवस्था उच्चनीचतेच्या पायावर अधिष्ठित असून ब्रह्मकर्म करणारा ब्राह्मण सर्व श्रेष्ठ व शूद्र हा कनिष्ठ प्रतीचा समाजांत समजला गेला. ज्याचा ज्या वर्णामध्यें जन्म, त्याप्रमाणें त्याची श्रेष्ठ–कनिष्ठता समाजामध्यें ठरूं लागली. व अशा रीतीनें सामाजिक व्यक्तिप्रतिष्ठा जन्मानें ठरली जाऊं लागली.

वर्णांतर्गत देश व्यवसायानुसार लहान लहान संघटना निर्माण होऊं लागल्या, व ह्यांतूनच जातिव्यवस्था निर्माण झाली. ज्या वर्णांत ज्याचा जन्म, त्याप्रमाणें जशी सामाजिक प्रतिष्ठा ठरूं लागली; त्याचप्रमाणें ज्या जातींत ज्याचा जन्म, त्याप्रमाणें त्याची जातीहि ठरूं लागली. वर्णव्यवस्थेनुसार आणि रूढिनियमानुसार प्रत्येक जातीचा आचारधर्म निर्माण झाला. व जाती ही त्या जातीमध्यें जन्माला आलेल्या प्रत्येक व्यक्तीचें जीवन नियमित करूं लागली. जातीय व्यवस्था प्रत्येक व्यक्तीवर आचारधर्माचे संस्कार करून व्यक्तिमत्त्व

[ *ता. २४।५।६१ रोजीं पुणें येथें वसंत व्याख्यान मालेतर्फे झालेलें व्याख्यान ]








अनुक्रमणिका

तयार करूं लागली; व आचारधर्मांचें पालन करणाऱ्या व्यक्तीला संरक्षण देऊं लागली. या जातिसंस्थेचे व्यक्तिजीवनावर दोन प्रकारचे परिणाम झाले. (१) आचार-साधर्म्यांमुळें व वैवाहिक रक्तसंबंधामुळें जातीशीं भावनात्मक ऐक्य प्रस्थापित होऊन जाति ही संरक्षण देणारी संस्था ठरली व (२) जातिसंघटना प्रभावी झाल्यास व्यक्तिजीवन प्रभावी होऊं शकेल ही भावना निर्माण झाली.

सांचेबंद अशा वर्णव्यवस्थेनें आणि जातिव्यवस्थेनें भूतकाळांत वैदिक धर्माचें संरक्षण करून, राजकीय स्थित्यंतरें होऊनसुद्धां, वैदिक संस्कृति व वैदिक समाज दृढमूल ठेवण्याचें कार्य केलेलें आहे. पण इंग्रजांची सत्ता भारतांत आल्यानंतर व पाश्चात्य वैज्ञानिक संस्कृतीचा पगडा पडूं लागल्याबरोबर वर्णव्यवस्थेला तडे जावयाला लागले. व धर्मप्रणित वर्णाचरण लुप्त झालें. अध्ययन, तत्त्वचिंतन व धर्मनिरूपण हाच ब्रह्मवर्णीयांचा आचारधर्म राहिला नाहीं व 'ब्राह्मणाची मुख्य दीक्षा। मागितली पाहिजे भिक्षा। ओम् भवति या पक्षा। सोडूं नये।' या उक्तीला महत्त्वहि राहिलेलें नाहीं. तद्वतच क्षत्रियधर्म हाच क्षत्रियांचा व्यवसायधर्म राहिलेला नसून कोणत्याहि वर्णाचा मनुष्य कोणत्याहि अन्य वर्णाचीं कृत्यें करूं लागलेला आहे. आजच्या वैदिक समाजामध्यें वर्णव्यवस्था राहिलेली नाहीं, ती पूर्णपणें कोलमडून पडलेली आहे. पण वर्णव्यवस्थेनें निर्माण केलेली जन्माधिष्ठित उच्चनीचतेची भावना मात्र मूळ धरून राहिली व कनिष्ठ वर्णियांचे प्रयत्न उच्चवर्णियांची उच्चत्वाची मान्यता काढून घेण्याकडे लागते, तर उच्चवर्णियांचे प्रयत्न स्वतःचें उच्चत्व कायम ठेवण्याकडे लागते. या संघर्षामधून ब्राह्मण–ब्राह्मणेतर वादाचा जन्म झालेला दिसून येतो व तिन्ही उच्च वर्णियांनीं अस्पृश्यांच्या समानत्वाला विरोध केल्यामुळें अंतिमतः अस्पृश्य समाजाला बुद्ध धर्माचा स्वीकार करावा लागला व स्पृश्यास्पृश्यवादाचा संघर्ष आतां हिंदु–बुद्ध वादामध्यें परिवर्तित झाला.

अशाप्रकारें वर्णसंघर्ष चालू असतांनाच भारतीय घटनेनें वर्णभेदाला व जातीय भेदाला बाजूला सारून समानतेचे हक्क नागरिकांना दिले. हे हक्क मिळाल्याबरोबर प्रत्येकाच्या मनांत स्वप्रतिष्ठेची ज्योत निर्माण झाली. व भावनात्मक ऐक्य निर्माण झालेली जातिसंस्था बलवत्तर झाल्यास सत्तास्पर्धेमध्यें टिकून राहतां येईल, ही भावना निर्माण होऊन जातिसंस्था दृढमूल करण्याकडे जाणूनबुजून वा अजाणतां प्रयत्न सुरूं झाले व वर्णसंघर्षाला आणखी चालना मिळाली. पर जातीचा नेता असेल तर राजकीय तत्वांची क्षिति न बाळगतां परकेपणाची भावना निर्माण होऊं लागली व जातीय वादानें राजकीय क्षेत्र दूषित व्हावयाला लागलें.

अशा तऱ्हेनें भारतीय स्वातंत्र्यानंतर हिंदु समाजामध्यें दोन प्रकारचे दोष निर्माण झालेले आहेत: (१) वर्णवर्चस्व कायम ठेवण्यासाठीं उच्चवर्णियांची प्रवृत्ति व वर्णवर्चस्व नाकारून समानत्व प्रस्थापित करण्याची कनिष्ठवर्णीयांची प्रवृत्ति; (२) जातिसंघटना दृढमूल करून जातीला अधिकार, श्रेष्ठत्व प्राप्त करून देण्याची प्रवृत्ति. या दोन्हीहि दोषांचें परिमार्जन झाल्याशिवाय भारतीय स्वातंत्र्य अबाधित राहूं शकणार नाहीं व वैज्ञानिक जगामध्यें भारत मानाचें स्थान मिळवूं शकणार नाहीं. म्हणून आज भारतीयासमोर प्रश्न आहे तो असा कीं, पुरातन धर्मप्रणित विषमताबद्ध वर्णभेदावर आधारलेली समाजरचना कायम ठेवून लोकशाहीनिष्ठ राज्यपद्धतीला पारखें व्हावयाचें कीं घटनांतर्गत समानतेच्या तत्त्वावर सामाजिक पुनर्रचना करून भारतीय लोकशाही आणि स्वातंत्र्य दृढमूल करावयाचें.' या प्रश्नाचें उत्तर कांहींहि दिलें तरी घटनेनें प्रदान केलेल्या समानतेच्या हक्कामुळें वर्णव्यवस्थेला शह बसणार, हें निर्विवाद आहे. जन्माधिष्ठित कनिष्ठपणा कोणीहि मान्य करणार नाहीं. व सामाजिक परिवर्तन होणार हें निश्चित. म्हणून खरा प्रश्न उपस्थित होतो तो हा, कीं असंबद्धपणें व जातिसंस्थाना प्रबल होऊं देऊन सामाजिक परिवर्तन घडूं द्यावयाचें, कीं सुसंबद्धपणें राष्ट्रीय दृष्टींतून समानतेच्या तत्वांवर एकजिनसी समाजरचना निर्माण करावयाची, हें वैदिक समाजाला ठरवावयाचें आहे. अर्थात दुसराच पर्याय आपणांला भारतीय स्वातंत्र्य व लोकशाही दृढमूल करण्यासाठीं स्वीकारावा लागणार आहे. म्हणून आज समानतेच्या तत्वावर नवसमाजाची निर्मिति करण्यासाठीं निश्चित योजना आखून सामाजिक परिवर्तन घडवून आणणें अवश्य आहे.








## धर्मसंघर्ष

भारतामध्यें दुसरा आढळून येणारा संघर्ष म्हणजे धर्मसंघर्ष हा आहे. त्यांतहि विशेषेंकरून हिंदु आणि मुसल्मान धर्मियामध्यें कटुतेची भावना निर्माण झालेली आहे. स्वातंत्र्यपूर्व काळांत या दोन धर्मसंघर्षांतून भारताची फाळणी झाली व बहुसंख्य मुसलमान लोकवस्तीचा भाग मिळून पाकिस्तान निर्माण झालें. व बहुसंख्य हिंदु लोकवस्तीचा भाग मिळून भारत निर्माण झाला. पाकिस्तानांत हिंदु अल्पसंख्य जमात झाली. व मुसलमान भारतांत अल्पसंख्य जमात झाली. भारतीय घटनेनें इतर अल्पसंख्य जमाती बरोबरच मुसलमान जमातीलाहि समानतेचे, स्वातंत्र्याचे व धर्म व संस्कृति-संरक्षणाचे हक्क प्रदान केलेले आहेत. व भारतीय नागरिक म्हणून प्रतिष्ठा मिळविण्याचे सर्व मार्ग खुले ठेवलेले आहेत. भारतीय घटना कार्यक्षम राहूं शकली, तरच भारताचा आणि पर्यायानें सर्वधर्मियांचा उत्कर्ष साधला जाऊं शकतो. धर्मसंघर्ष हा भारताच्या उत्कर्षाचा महान् शत्रू आहे. मध्येंमध्यें धर्मसंघर्ष डोकें वर काढूं लागतो व भारतीय राजकीय जीवन दूषित करावयाला लागतो. घटनाप्रणित एकजिनसी भारतीय समाजनिर्मितीसाठीं धर्मसंघर्षाचीं कारणें शोधून काढून त्यावर उपाययोजना करणें अवश्य आहे.

हिंदु आणि मुसलमानांमधील सध्यांच्या संघर्षाचें एक कारण म्हणजे हिंदुस्थानच्या फाळणीला मदत केल्यामुळें भारतीय मुसलमानांच्या मनामध्यें निर्माण झालेली शंका की हिंदुसमाज त्यांना भारतनिष्ठ समजणार नाहीं. व त्यामुळें त्यांना भारतामध्यें संरक्षण मिळणार नाहीं. त्याचप्रमाणें हिंदूंच्या मनांत भारतीय मुसलमानांनीं अखंड भारताला विरोध केल्यामुळें निर्माण झालेली भावना, कीं अल्पसंख्य मुसलमान भारताला एकनिष्ठ राहणार नाहींत. पण ही परस्पर-संशयाची भावना भारताच्या दृढमूलतेला बाधा करणारी आहे, यांत कांहींहि संशय नाहीं. भारतामध्यें हिंदुसमाज विशाल असल्यामुळें भारतीय स्वातंत्र्याला अल्पसंख्य समाज धक्का पोहोंचवूं शकेल, ही परिस्थितीच मुळीं असंभवनीय आहे व हिंदुसमाज जर एकजिनसी राहिला, तर कोणताहि अल्पसंख्य समाज भारतीय स्वातंत्र्याला धोका निर्माण करूं शकणार नाहीं. म्हणून भारतीय घटनेनें पुरस्कारिलेल्या उदात्त तत्त्वानुसार हिंदु समाजानें अल्पसंख्य जमातीच्या मनामध्यें संरक्षणाची व तेहि भारताचे थोर सुपुत्र होऊं शकतात ही भावना दृढमूल करणारी परिस्थिति निर्माण करणें अवश्य आहे. अशी परिस्थिति निर्माण झाल्यानंतरच जे कोणी राष्ट्रद्रोह करतील, त्यांना शासन करणारी प्रभावी राज्ययंत्रणा निर्माण होऊं शकेल. त्याचप्रमाणें अल्पसंख्य जमातीचें सुद्धां कर्तव्य आहे, कीं बहुसंख्य जमातीच्या मनामध्यें वसत असलेली शंका दूर करणें आणि तीहि आपली भारतनिष्ठा दाखवून. या प्रकारें परस्परांबद्दलच्या भावना वृद्धिंगत झाल्यानें धर्मसंघर्ष नष्ट होऊं शकेल.

हिंदु–मुसलमानांमध्यें दिसून येणारा दुसऱ्या प्रकारचा संघर्ष हा धर्माचरणामधून निर्माण होणारा आहे. ज्या वेळेला राजसत्ता होती, त्या वेळेला सामाजिक नियंत्रण धर्मसत्तेच्या हातीं होतें. पण राजसत्ता जसजशी लोकसत्तेमध्यें परिवर्तित व्हावयाला लागली तसतशी धर्मसत्तेची समाजनियंत्रणावरील पकड कमी होऊन ती जागा लोकसभेसारख्या प्रातिनिधिक सत्तेनें घेतली व अशा रीतीनें श्रद्धामय धर्म आणि आचारधर्म लोकशाहीच्या विकासाबरोबर विभागले जाऊन श्रद्धामय धर्म वैयक्तिक जीवनांतली बाब झाली व आचारधर्म प्रातिनिधिक राष्ट्रीय संस्थेनें नियंत्रित असा झाला. पाश्चात्य राष्ट्रांमध्यें अशा प्रकारचीं स्थित्यंतरें होऊनच लोकशाही दृढमूल होऊं शकली व भारतामध्येंसुद्धां या परिवर्तनाला सुरवात झालेली आहे. भारतीय घटनेनें दिलेलें धर्मस्वातंत्र्य हें कांहीं लोकसभेचें अधिकारक्षेत्र मर्यादित करून दिलेलें नसून, तें फक्त श्रद्धामय धर्मपालनाचें स्वातंत्र्य आहे. आणि म्हणून तो संघर्ष टाळण्यासाठीं आचार धर्माला प्रत्येक धर्मानें मुरड घालणें अवश्य आहे व ज्या योगें आचार धर्मांतील संघर्ष टळेल, अशा प्रकारची समन्वयाची व सहकार्याची दृष्टि ठेवणें जरूर आहे. प्रत्येक राष्ट्रनिष्ठ भारतीयानें ही दृष्टि ठेवायला पाहिजे. उदाहरणार्थ, नमाज करण्याचें वेळीं मशिदीसमोरून वाद्य वाजवीत नेल्यास मुसलमानांच्या धर्मभावना दुखविल्या जात असल्यास त्यावेळीं त्या मार्गानें मिरवणूक न नेण्यांत हिंदूंची थोरवी राहील. तर हिंदूंना गाय पवित्र असल्या-








मुळें गाईची हत्या न करण्यामध्यें मुसलमानांची थोरवी राहील अशा प्रकारें परस्पर सहकार्य राहिल्यास धर्मस्वातंत्र्य कायम राहून एकजिनसी भारतीय समाज निर्माण करतां येईल. व भारतीय लोकशाही दृढमूल होईल.

## सामाजिक परिवर्तनाचे मार्ग

एकजिनसी भारतीय समाज निर्माण करण्यासाठीं निश्चित अशी उपाययोजना करणें अवश्य आहे. तरच घटनेला अभिप्रेत असलेली समता आणि स्वातंत्र्याच्या तत्वावर अधिष्ठित समाजरचना निर्माण होऊं शकेल. हिंदु समाजामध्यें असलेल्या वर्णश्रेष्ठत्वाच्या भावनेला नष्ट करण्यासाठीं व धर्मसंघर्ष मिटविण्यासाठीं ‘ राष्ट्रीय आचारसंहिता ’ तयार करावयाला पाहिजे. या राष्ट्रीय संहितेमध्यें निषेधात्मक आणि आदेशात्मक दोनहि प्रकारचें आचरण असावयाला पाहिजे. व ही संहिता सर्व धर्मियांना व सर्व वर्णियांना लागू असावयाला पाहिजे. आचारसंहितेचे संस्कार बालपणापासून होण्यासाठीं शिक्षण संस्थांमधून सतत पाठ द्यावयाला पाहिजे. आचारसंहितेचे संस्कार बालपणापासून होण्यासाठीं शिक्षण संस्थांमधून सतत पाठ द्यावयाला पाहिजे. अशा तऱ्हेनें धर्मवर्णातीत भारतीय राष्ट्रीय पुरुष निर्माण करतां येईल.

हिंदु समाजांतर्गत जातिसंस्था नष्ट करण्यासाठीं जातिसंस्थेनें जें व्यक्ति-संरक्षणाचें व सहकार्याचें कार्य केलेलें आहे, तें कार्य करण्यासाठीं व्यावसायिक संघटणांना प्रोत्साहन देऊन प्रत्येक व्यावसायिक संघटनेची नैतिक आणि सामाजिक ऐक्य दृढमूल करणारी व्यावसायिक आचारसंहिता तयार व्हायला पाहिजे. व या आचारसंहितेमध्येंच संहितेचें पालन न करणाऱ्या व्यक्तीला सामाजिक शिक्षेची तरतूद असावयाला पाहिजे. व्यावसायिक आचारसंहिता निर्माण होऊन ती व्यक्तीच्या जीवनांत रुजल्यास जन्मावर अधिष्ठित असलेली जातिसंस्था जाऊन कर्मावर अधिष्ठित असलेली व्यवसाय-संस्था निर्माण होईल. व त्यामुळें राष्ट्रीय ऐक्य दृढमूल होऊं शकेल.

जातिसंस्थेनें निर्माण केलेले उक्त संबंध बदलविण्यासाठीं आंतरजातीय विवाहांना प्रोत्साहन देणें अवश्य आहे. व तें कार्य हिंदु विवाह कायद्यानें कांहीं प्रमाणांत केलेलेंच आहे.

राष्ट्रीय आचारसंहिता तयार करण्यासाठीं सरकारनें एक समिति नेमावी व त्या समितीमध्यें, भारतामध्यें असलेल्या सर्व धर्मांचा अभ्यास केलेले पंडित, समाजशास्त्रज्ञ, मानवशास्त्रज्ञ व सामाजिक नेते यांचा समावेश असावा. तद्वतच व्यावसायिक आचारसंहिता तयार करण्यासाठीं प्रत्येक व्यवसायांतील तज्ञ, समाजशास्त्रज्ञ, मानसशास्त्रज्ञ यांची समिति नेमावी.

अशा प्रकारचे योजनाबद्ध प्रयत्न केल्यास एकजिनसी भारतीय समाज सहज निर्माण करतां येईल. व भारतीय घटनेनें पुढें ठेवलेलें कल्याणकारी राज्याचें व जागतिक शांततेचें ध्येय साकार करतां येईल.

---

# वाचकांचा पत्रव्यवहार –

## रशिया–अमेरिका भाष्य

न्यू हेवन, 'येल विद्यापीठ'
११ सप्टेंबर १९६१

प्रिय ती. आबा यांस—

क्रृ. सा. न. वि. वि.

तुमचें पत्र पावलें, आतां दोन आठवडे होऊन गेले आमचें सर्व ठीक चाललें आहे.

यावर्षी न्यूयॉर्क, न्यू हेवन व बॉस्टन पट्ट्यांत कांहीं कांहीं वेळेस उन्हाळा मुंबईसारखा जाणवला. फक्त येथल्या उन्हाळ्यांत सातत्य कमी. उन्हाळा जास्त झाला कीं पाऊस, कीं पुनः गार हवा असें झोपाळी हवामान गेले दोन महिने चालू आहे. येथला सृष्टीचा सर्व चमत्कार आतां सरावामुळें मला भासेनासा होत आहे.

वेलिविंगच्या लग्नासाठीं गेल्या शनिवारी वॉशिंग्टनला जाऊन आलों. चर्चमध्यें पंधरा मिनिटांत लग्नविधि संपला. इन्हान कॅथलिक असली तरी वेलि बॅप्टीस्ट म्हणून कॅथलिक चर्चमध्येंहि पंधरा मिनिटांत लग्न-समारंभ संपला. कॅथलिक वधुवरांचें लग्न असलें म्हणजे लॅटिनमधलें मंत्रपठन चालू असतां लोकांना झोप लागते. दुपारीं दोन वाजतां अतिशय सुरस चिनी जेवण मिळालें. नंतर राल्फ ॲटलरच्या गाडींतून न्यू हेवनला यायला निघालों, बाल्टीमोरला आमची दिशा चुकली. राल्फची बायको नेहमी म्हणते कीं, राल्फला दिशेचें भान आश्चर्यकारक आहे. उत्त-रेला जाण्याऐवजीं पश्चिमेला ३०० मैल चुकत गेलों. वाटेंत रात्रीं ९ वाजतां आयसेन हॉवरांचें गेटिस्बर्ग लागलें. शेवटीं ३ वाजतां रात्रीं आम्ही घरीं सबंध शरीरानिशीं परतलों.

वॉशिंग्टनमध्यें शुक्रवारी संध्याकाळीं वॉशिंग्टन स्तंभापासल्या बाकावर बसून नाकासमोरील व्हाईट–हाऊसकडे तोंड करून मी कितीवेळ एकटा बसलों माहित नाहीं, पण चक्क दिसणारा सूर्य केव्हांच गुडुप झाला होता. मनांत विचार चालला होता कीं, या समोरच्या प्रासादांत राहणारा केनेडी नांवाचा नवीन रहिवासी आपल्याला मायदेशीं सुखरूप जाऊं देईल कीं नाहीं ! पण नंतर वाटलें त्या बिचाऱ्याच्या हातीं कांहीं नाहीं. सगळे अनिवार्य घटनांचे बधे आहेत !

रशियानें अणु-चाचण्या सुरूं केल्या. शंभर दशलक्ष टी. एन्. टी. अणुबॉंब तयार करूं असें जाहीर केलें. सगळें जग भयभीत झालें. अलिप्त राष्ट्रांचीं तोंडें मुकी पडलीं पण त्यांच्या तोंडून धिक्काराचा शब्द नाहीं. केनेडी खाजगी म्हणाले, माझी या अप्रगत राष्ट्रांना आर्थिक मदत करण्याची नीति बरोबर आहे याची मला शंका येऊं लागली आहे. या अमेरिकेंत लोक आम्हांला एकच प्रश्न विचारतात, "आम्ही चुका केल्या तर तुम्ही आमचा कठोर धिक्कार करतां पण रशियानें मोठे गुन्हे केले तरी तुम्ही नापसंतीसुद्धां दाखवत नाहीं हें कसें ?" मी उत्तर देतो, "गांवां-तील गुंडानें गुन्हा केला तर लोक त्याचा विचारदेखील करीत नाहींत; पण वजनदार सभ्य माणसाच्या हातून थोडी नैतिक चूक घडल्यास सगळा गांव चर्चा करतो". पण खरें म्हणजे मला उत्तर नाहीं. सगळीं अलिप्त राष्ट्रें रशियाला टरकतात हेंच खरें !

बर्लिनवर युद्ध घडेल असें वाटत नाहीं. पण घड-ण्याची शक्यताहि कमी नाहीं. रशिया अमेरिकेला पूर्ण ओळखत नाहीं असें वाटतें. "हे अमेरिकन बर्लिन-साठीं कशाला मरतील." हें बुद्धिबळाच्या नियमांत बसतें. परंतु पोकरच्या खेळांत बसत नाहीं. अमेरिकेंत पोकर अतिशय प्रिय ! त्यांचें राजकारण पण तसेंच. त्यामुळें जगाचा ग्रास केवळ बारक्या चुकीमुळें घडण्याची शक्यता कमी नाहीं.

शंभर दशलक्ष टी. एन्. टी. अणुबॉंब हें युद्धाचें अस्त्र नाहीं याची या देशांतील तज्ज्ञांना खात्री आहे आणि तो तयार करणें अवघडहि नाहीं. पंचवीस दश-लक्ष शक्तीचे चार बॉंब शंभर दशलक्ष शक्तीच्या बॉंब-पेक्षां कितीतरी पट जास्त नुकसान युद्धाच्या दृष्टीनें करतात. अमेरिकेजवळ असल्या बॉंबचें प्रचंड भांडार आहे; शिवाय अणुबॉंबच्या एकूण विद्येत रशिया अमेरिकेपेक्षां खूपच मागें आहे यांत येथील तज्ज्ञांत ऐकमत्य आहे.

रशियाची शास्त्रीय प्रगति मंद आहे. पण कांहीं विशिष्ट तांत्रिक प्रगति अमेरिकेपेक्षां पुढारली आहे हें खरें. गेल्या पंधरा वर्षांत मूलभूत संशोधनांत-फिजिक्स, केमिस्ट्रि, बायॉलॉजि इत्यादि विषयांत दरवर्षी अमे-रिकेंतील एक दोन तरी शुद्ध अमेरिकन्स नोबेल-प्राइझ








मिळवितात. रशियांतील फक्त एक दोषांनाच गेल्या पंधरा वर्षांत नोबेल प्राइझ मिळालें. गणित विद्येंत मात्र रशियन्स आज अमेरिकनांच्या बरोबरीनें आघाडीवर आहेत. त्यांचें फिजिक्स दुसऱ्या दर्जाचें आणि केमिस्ट्रि व इतर शास्त्रें तिसऱ्या दर्जाचीं आहेत. या माझ्या विधानांबाबत फारसें दुमत नाहीं. अणुशस्त्रें बांधणें हें हिंदुस्थानदेखील आतां करूं शकेल. खूप पैसा, संघटना, एका विशिष्ट दिशेनें संकुचित क्षेत्रांत पल्ला गांठलेली तांत्रिक घडण व मूलभूत तत्त्वें समजणारे शास्त्रज्ञ असले तर अणुशास्त्रांत विलक्षण प्रगति करतां येते. सध्यां त्याकरितां मूलभूत फिजिक्समधल्या जीनियस शास्त्रज्ञांची गरज नाहीं. याचा अर्थ रशियांत मूलभूत शास्त्रें प्रगत होणार नाहींत असं नाहीं. पण राज्यकर्त्यांना सध्यां त्याची मात बरी वाटत नाहीं. तांत्रिक प्रगति व शास्त्रीय प्रगति यांच्यांत समप्रमाण असलेंच पाहिजे असें नाहीं हें ते राज्यकर्ते बरोबर ओळखतात. रशियनांची अंतराळांतील झेप ही केवळ त्यांच्या एका दोषांतून जन्मलेला गुण आहे. त्यांचा हैड्रोजन बाँब अतिशय अवजड म्हणून रॉकेट पहिल्यापासून अवजड वजन फेकणारें बनवावें लागलें. अमेरिकेचा हैड्रोजन बाँब अधिक शक्तिमान पण हलका त्यामुळें रॉकेट छोटें बनवावें लागलें. नवीन रॉकेट बनवायला चार-पांच वर्षें लागतात. त्यामुळें आज अमेरिका रशियाच्या अंतराळांत माणूस पाठविण्याच्या नेत्रदीपक विजयांत फिकी दिसते, पण पुढील वर्षी ही माघार नाहीशी होईल. रशियन अवकाशविजय ही एक आकस्मिक घटना आहे. शिवाय रॉकेटस् बनविणें ही मोठी शास्त्रीय प्रगति नाहीं. अमेरिकेच्या छोट्या रॉकेटस्नी व ग्रहांनी जेवढी या विश्वाच्या ज्ञानांत भर घातली आहे त्यांच्या दशांशदेखील रशियानें घातलीं नाहीं. अमेरिकेचीं सूक्ष्म यंत्रें इतकीं विलक्षण ज्ञानोपासना करत आहेत कीं येथल्या शास्त्रज्ञांत त्याविषयीं विलक्षण अभिमानहि निर्माण झाला आहे. अमेरिकन सूक्ष्म यंत्रें ( Miniature Instruments ) ही देखील त्यांच्या छोट्या रॉकेटस्ची तार्किक परिणति आहे. अंतराळांत माणसांपेक्षां यंत्रें फार सुरेख काम करतात असें शास्त्रज्ञांचें ठाम मत आहे पण जनतेला दिपवायला हें मात्र खरें.

वरील या सर्व विवेचनांत मी ' कॅपिटॅलिस्ट लॅकी ' सारखी जरी वकिली केली असली तरी रशियन प्रगतीबद्दल मला कमी आदर नाहीं.

ह्या देशांत उनाड पोरें कमी. शाळा–कॉलेजांतून गणित व शास्त्रें यावर अमेरिकेंतल्यापेक्षां फार जोर दिला जातो. सरकारी नियंत्रणामुळें आणखी कांहीं वर्षांत रशिया अमेरिकेबरोबर येईल यांत शंका नाहीं. पण सर्वंकष नियंत्रणाचे किती तरी दुष्परिणाम रशियन शास्त्रीय प्रगतीवर होत आहेत हें मात्र निश्चित आहे. अमेरिकेंत एक्स–रे मशीन पंचवीस कंपन्या निर्माण करतात म्हणून पुनरावृत्तीचा दोष घडत असला तरी त्याबरोबरच वैचित्र्यपूर्ण सुधारणाहि घडते व सुरेख अधिक प्रभावी मशिनांचे प्रकार तयार होतात. रशियांत एकच राष्ट्रीय कंपनी एक्स–रे मशीन करणार त्यामुळें पुनरावृत्तीचा दोष घडत नाहीं, त्याबरोबर वैचित्र्यहि निर्माण होत नाहीं. विविध दर्जाच्या प्रतवारींना त्यांत कमी वाव राहतो. हुशार माणसांचें एक टोळकें जेवढें काम चांगलें करील त्यापेक्षां हुशार माणसांचीं अनेक छोटीं टोळकीं किती तरी चांगलीं कामें करतील, असें मला वाटतें. अर्थात् त्यामुळें सुरुवातीला खर्च फार होतो हें खरें.

माझें हें अमेरिका-रशिया भाष्य आतां पुरें झालें.

लिहिण्यासारखें विशेष नाहीं. दहा दिवसांत ' येल विद्यापीठ ' सुरू होईल. नवीन विद्यार्थी येऊं लागले आहेत. शांत येल आतां पुनः तरुण रक्तानें सचेतन होईल. माझें संशोधन बरें चालूं आहे.

प्रा. फुऑस नोव्हेंबरांत दिल्लीला इलेक्ट्रो-केमिकल परिषदेला येणार आहेत. त्यांना दोन दिवस वाई–पुणें –मुंबई दाखवाल कां ? मी त्यांच्याशीं चर्चा करून त्यांचा कार्यक्रम कळवीन. प्रा. फुऑस यांनी मला Quantum Mechanics येथें शिकविलें.

ती. सौ. सतीची तब्येत कशी काय ? अप्पाला तूप व सिगरेट सोडावयास मदत करावी, तूप खाणें तुम्ही सगळ्यांनीं कमी करावें. फक्त वीस वर्षांपर्यंत तूप खाणें ठीक, पुढें डालडा व तूप विषासारखें बाजूला करावें. डालडा तर महाविष ! तुम्ही व सतीनें वजन कमी करण्याचा कार्यक्रम पण हातीं घ्यावा. तुमचें आयुष्य दहा-पंधरा वर्षांनीं तरी खास वाढेल.

आपला

**मधु**












# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | किंमत |
|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | ५२–०–० |
| | कापडी बांधणी ... ... ... | ६४–०–० |
| (२) धर्मकोश – उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | ११०–०–० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १२६–०–० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला .... | | ४५–०–० |
| (४) मीमांसादर्शन ... ... ... ... | | ३०–०–० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ५ | | १६५–०–० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | | ६–०–० |
| (७) हिंदुधर्माची समीक्षा (लक्ष्मणशास्त्री जोशी) ... | | ५–०–० |
| (८) वैदिक संस्कृतीचा विकास ... .. ... | | ६–०–० |
| (९) नवमानवतावाद ... ... ... ... | | २–८–० |
| (१०) मानवाचा आदर्श ... ... ... ... | | ३–०–० |
| (११) चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान | | |
| | (प्रा. सदाशिव आठवले) ... | ३–०–० |
| (१२) गीता-प्रवेश (डॉ. गो. वि. देवस्थळी) ... | | २–८–० |
| (१३) छत्रपति संभाजी महाराज (श्री. वा. सी. बेंद्रे) .... | | १६–०–० |
| (१४) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना | | |
| | (श्री. चा. अ. दाभोलकर) .... | २–०–० |

अनुक्रमणिका

